# संस्कृतभाषाप्रदीप

## पुस्तक—१ लें

### शुद्धिपत्र

पान ९ ओळ १३ आ—'आत्मनेपदी' बद्दल 'उभयपदी'
,, ९ ,, १५ इ—'उभयपदी' ,, 'आत्मनेपदी'
,, १४ ,, २५ 'नपुसलिंगी' ,, 'नपुसकलिंगी'
,, ३६ ,, २२ प्रश्न २ मधील 'अन्तरेण' हा शब्द गाळावा.
,, ६३ ,, २३ 'भोर् इह-भोरिह' बद्दल 'भो इह' पाहिजे
,, ,, ,, २४ 'भोर्मम' ,, 'भो मम' पाहिजे.
,, ६४ ,, १ 'र् होतो' ,, 'लोप होतो' पाहिजे.
,, ,, ,, २ 'सन्धि होत नाहीं' ,, 'सन्धि नेहमींप्रमाणें होतो' पाहिजे.
,, ७७ ,, ९ 'स्वाकार' बद्दल 'साकार' पाहिजे
,, ९० ,, ३ 'माला' बद्दल 'माला' पाहिजे.
,, ११२ अभ्यास ३—'बहुमूल्यानि' बद्दल 'बहुमूल्यानि' पाहिजे
,, १४१ ओळ १० 'स यति' बद्दल 'स यति' पाहिजे.
,, १४९ ,, १५-१६ 'व्यापादयाति' बद्दल 'व्यापादयाति' पाहिजे
, १६६ श्लोक ४—'सौरम' बद्दल 'सौरभ' पाहिजे.

---

मॅक्मिलन् आणि कंपनी, लिमिटेड,
हॉर्न्बी रोड, कोट, मुंबई

किंमत १२ आणे] १९३६ [सर्व हक्क स्वाधीन

# संस्कृतभाषाप्रदीप

## पुस्तक–१ लें

( दुय्यम शाळांतील चौथ्या इयत्तेकरितां )

सखाराम रावजी भट, एम्.ए., बी.टी.

'मॅट्रिक्युलेशन संस्कृत-वाक्यरचना' पुस्तकाचे कर्ते

मॅक्मिलन् आणि कंपनी, लिमिटेड,

हॉर्न्बी रोड, कोट, मुंबई

किंमत १२ आणे]  १९३६  [सर्व हक्क स्वाधीन

# प्रस्तावना

गेल्या अठरा वर्षांत दुय्यम शाळांतून संस्कृत शिकवितांना जो अनुभव मिळाला त्याला प्रस्तुत पुस्तकांत मूर्त स्वरूप देण्यात आलेलें आहे. या काळामध्यें व्याकरणप्रधान स्वरूपापासून वाङ्मयप्रधान स्वरूपाकडे संस्कृतच्या अभ्यासक्रमाचा कटाक्ष झुकत आला आहे. त्याचप्रमाणें संस्कृत शिकविण्याच्या पद्धतींतहि बदल होत आला आहे. गु० प्रो० बोकील यांनीं संस्कृत भाषा शिकविण्याची अभिनव पद्धति दहा वर्षांपूर्वी सुरू केली व तिचा ठिकठिकाणीं प्रसार होऊन ती यशस्वी रीतीनें चालूहि आहे.

वाङ्मयाबरोबरच व्याकरण शिकविण्याचे बाबतींतहि बदल करणें क्रमप्राप्तच होतें. म्हणून प्रथम केवळ नियम शिकून नंतर रूपसिद्धि करण्याच्या पूर्वीच्या पद्धतीपेक्षां भरीचशीं उदाहरणें प्रथम देऊन त्यांवरून सामान्य नियम काढण्याच्या पद्धतीचा अवलंब करण्यात आला. त्यामुळें विद्यार्थ्यांस व्याकरण शिकणें रुक्ष न वाटतां मनोरंजक वाटूं लागलें व विषय ध्यानात राहण्यासहि मदत होऊं लागली. या अनुभवाचा आधार घेऊनच प्रस्तुत पुस्तकाची रचना करण्यात आली आहे. अर्थात् अपवादप्रचुर अशा संस्कृत व्याकरणाला ही पद्धति सर्वतोपरी लावणें अशक्य आहे याची जाणीव प्रस्तुत लेखकाला आहे हें पुस्तकांतील विषयाच्या मांडणीवरून ध्यानात येईल.

प्रवेशपरीक्षेचे नवीन अभ्यासक्रमानुसार व्याकरणविषयाचें अध्ययन दुय्यम शाळांतील पहिल्या तीन वर्षांतच स्थूल स्वरूपांत संपविणें आवश्यक आहे. याच दृष्टीनें या पहिल्या पुस्तकांत सर्वनामें, संख्याविशेषणें वगैरे भाग देण्यात आला आहे.

केवळ व्याकरण पुस्तक नीरस वाटूं नये म्हणून व्याकरणक्रमानुसार वाङ्मय-विभागहि पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत आवश्यक शब्दसमूहासह देण्यात आला आहे.

मराठीचें संस्कृत भाषान्तर पांचव्या इयत्तेपासून चालू करावें असा मतप्रवाह वाहूं लागला आहे. परंतु ज्यास तें चौथ्या इयत्तेंतच सुरू करावें असें वाटत

असेल त्याचेकरिता तिसऱ्या भागामध्यें संस्कृत भाषान्तराकरिता सूचना व टीपा यासह मराठा उतारे देण्यात आले आहेत

प्रस्तुत पुस्तक लिहिताना सिद्धांतकौमुदी व इतर प्रचलित संस्कृत पुस्तकाचा मला जो उपयोग झाला त्याचा या ठिकाणीं कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें जरूर आहे. त्याचप्रमाणें गु० प्रो० गोखले यांच्या सानिध्यात नवीन पद्धतीनें संस्कृत शिकविण्याची संधि मिळाल्यामुळें मला प्रस्तुत पुस्तक लिहिण्याची कल्पना सुचली व त्याच्या व इतर मित्राच्या प्रोत्साहनान ता अमलात आणता आली याबद्दल त्यांचे आभार मानणें माझें कर्तव्य आहे पुस्तकाचें हस्तलिखित स्नेहभावानें वाचून मार्मिक सूचना केल्याबद्दल माझे मित्र श्री मो न मालेराव, एम् ए, बी टी, संस्कृत शिक्षक, सिटी हायस्कूल, धुळें यांचाहि मी फार आभारी आहें

मे १९३६ स. रा. भट

## पुस्तकाचा उपयोग करणाऱ्या शिक्षकांस सूचना

१ पुस्तक सुरू करण्यापूर्वी नवीन पद्धतीचा अवलंब करणाऱ्या शिक्षकांनीं विद्यार्थ्यांस एक महिनाभर परिचित विषयांचें संस्कृतमध्यें वर्णन करण्यास संभाषणद्वारा शिकवावें व नंतर पुस्तकांतील पाठ क्रमवार शिकवावे.

२ जुन्या पद्धतीनें शिकविणाऱ्या शिक्षकांनीं प्रथमतः सोपीं सोपीं कर्तृपद, क्रियापद व जरूर तेथें कर्मपद यांनीं युक्त अशी वाक्यें विषयवारीनें तीन्ही पुरुषांमध्यें व वचनामध्यें शिकवावीं व म्हणवून घ्यावीं आणि हें करतांना मराठीचा उपयोग अर्थ सांगण्याकरितां जरूर तेवढा करावा. पुष्कळशा क्रिया मुलांकडून करवून घ्याव्या व त्या संस्कृत वाक्यरूपानें म्हणवून घ्याव्या व नंतर पुस्तकांतील पाठ शिकविण्यास सुरवात करावी. यांत मुख्य हेतु एवढाच कीं मुलांना वाक्यरूपानें संस्कृतचा परिचय व्हावा, केवळ रूपसिद्धीच्या मार्गानें होऊं नये. ज्या शिक्षकांस वरील प्रमाणें करणें शक्य नसेल त्यांना अर्थातच पुस्तकांतील पाठ शिकविण्यास एकदम सुरवात करतां येईल.

३ प्रत्येक पाठाची मांडणी विद्यार्थ्यांस स्वावलंबी बनवील अशी असल्या-कारणानें विद्यार्थ्यांस विशिष्ट भाग स्वगत वाचावयास सांगून नंतर शिक्षकांनीं त्यासंबंधीं चर्चा करावी. प्रत्येक पाठाचे शेवटीं दिलेले प्रश्न सोडवून व लिहवून घ्यावे. संस्कृत शब्दांच्या रूपवैचित्र्यामुळें निरनिराळ्या शब्दांचीं रूपें कशीं होतात व त्यांचा उपयोग कसा करतात हें शिकविल्यानंतर त्या रूपांचें पाठान्तर करवून घ्यावें.

४ पहिल्या पाठामध्यें प्रथम गणाच्या कारक न होणाऱ्या धातूंचीं परस्मैपदी व आत्मनेपदी रूपें एकत्र दिलेलीं आहेत, कारण तीं सारख्याच नियमानुसार तयार केलीं जातात. जरूर तर तीं निरनिराळीं शिकविण्यास हरकत नाही.

५ वाक्यरचनेसंबंधी माहिती जरूरीप्रमाणें स्थूलस्वरूपांत दिलेली आहे, आणि विस्तृत विवेचनाकरितां संस्कृत-वाक्यरचना या पुस्तकांतील विशिष्ट भागाचा निर्देश करण्यांत आलेला आहे.

६ वाङ्मयविभागांतील पहिले १० उतारे सोप्या भाषेंत दिलेले आहेत आणि नंतर पञ्चतन्त्र व कथासरित्सागर यांतील कांहीं गोष्टी दुर्बोधता घालविण्याकरितां

इष्ट त्या फेरफारासह दिलेल्या आहेत. त्याचप्रमाणें दुर्बोधता कमी करण्याकरिता पहिल्या १५ पाठामध्यें सन्धि केलेले नाहीत. शेवटच्या तीन गद्यपाठामध्यें रघुवंशातील रघुराजाच्या अंतापर्यंतची कथा सोप्या भाषेत दिलेली आहे. भाषाविशेष नीट ध्यानात राहाण्याकरिता प्रत्येक पाठावर निरनिराळ्या तऱ्हेचे प्रश्न दिलेले आहेत. पद्यविभागातील सुभाषिताची निवड विषयवारीनें केलेली असून तीन गोष्टी पद्यरूपात दिलेल्या आहेत नवीन शब्दाचे अर्थ शोधून काढण्याची सवय व्हावी म्हणून शब्दसंग्रह देण्यात आला आहे.

७ संस्कृत भाषान्तराकरिता वर्णनात्मक अथवा कथात्मक असे १५ मराठी उतारे देण्यात आले आहेत. ते चौथ्या इयत्तेंत दुसऱ्या सहामाहीपासून शिकविण्यास हरकत नाही. शब्दश भाषान्तरावर जोर न देता मराठी वाक्यातील अर्थ संस्कृत रूपान्तरामध्यें बरोबर आणला जातो की नाही याकडे लक्ष देणें इष्ट आहे

# संस्कृतभाषाप्रदीप–पुस्तक १ लें.

## अनुक्रमणिका

### भाग १—व्याकरण-पाठ


| | | |
|---|---|---|
| | प्रास्ताविक माहिती—वर्णविचार ... ... ... | १ |
| १ | क्रियापदें–प्रथमगण–वर्तमानकाळ, परस्मैपद व आत्मनेपद ... | ४ |
| २ | ,, चतुर्थ, षष्ठ, दशम गण ,, ,, ... | ८ |
| ३ | नामें–अकारान्त ( पुंलिंगी व नपुंसकलिंगी ) ... ... | ११ |
| ४ | क्रियापदें–१-४-६-१० गण ( अनियमित फरकाचीं ) ... | १६ |
| ५ | ,, ,, ,, ( गुण-वृद्धि होणारीं ) ... | १९ |
| ६ | नामें–आकारान्त-ईकारान्त–स्वरसन्धि ... ... | २४ |
| ७ | उपसर्ग–स्वरसन्धि ... ... ... | २८ |
| ८ | अव्ययें ... ... .. ... | ३१ |
| ९ | सर्वनामें–अस्मद्, युष्मद्, तद्, एतद्, किम्, इदम्, सर्व–स्वरसन्धि | ३८ |
| १० | प्रथमभूतकाळ ( परस्मैपदी व आत्मनेपदी)–व्यंजनसन्धि ... | ४५ |
| ११ | विशेषणें–अकारान्त–विसर्गसन्धि ... .. ... | ५१ |
| १२ | ,, ,, ( भूतकाळवाचक धातुसाधित ) ... | ५६ |
| १३ | इकारान्त नामें व विशेषणें–विसर्गसन्धि ... ... | ६० |
| १४ | उकारान्त नामें व विशेषणें–स्वरसन्धि ... ... | ६६ |
| १५ | कर्मणि व भावेप्रयोग–व्यंजनसन्धि .. .. | ७१ |
| १६ | कर्मणि भूत० धातुसाधित विशेषणें व ल्यबन्त धातु० अव्ययें–व्यं. सन्धि | ७८ |
| १७ | ऋकारान्त नामें व एकारान्त शब्द–व्यंजनसन्धि . | ८५ |
| १८ | तुमन्त धातुसाधित अव्ययें व तव्यप्रत्ययान्त कर्मणि विध्यर्थक धातु० विशेषणें ... ... ... ... | ९० |
| १९ | आज्ञार्थ–परस्मैपदी व आत्मनेपदी ... ... | ९४ |
| २० | विध्यर्थ ,, ,, ... .. | ९७ |
| २१ | व्यंजनान्त नामें–विशेषणें (त्, द्, च्, ज् हे अन्त्य वर्ण असलेलीं) | १०० |
| २२ | न् अन्त्य वर्ण असलेलीं नामें–विशेषणें ... .. | १०६ |
| २३ | स् ,, ,, ,, ,, ,, ... ... | १११ |
| २४ | वर्तमानकाळवाचक धातुसाधित विशेषणें ... ... | ११४ |
| | उपसर्गसहित महत्त्वाचे धातु ... ... ... | १२० |
| | कांहीं व्याकरणविषयक संज्ञा ... ... ... | १२२ |

## भाग २—संस्कृत-पाठ

### गद्यविभाग


| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | ईश्वर । | १२४ | १४ | बलेश्चातुर्यम् । | १४२ |
| २ | शरीरम् । | १२५ | १५ | वञ्चित नृप । | १४४ |
| ३ | हिमालय । | १२६ | १६ | नागार्जुनकथा । | १४६ |
| ४ | उद्यानम् । | १२८ | १७ | कृतज्ञ नकुल । | १४७ |
| ५ | विहगा । | १२९ | १८ | बुद्धिहीना विनश्यन्ति । | १४९ |
| ६ | विद्यागृहम् । | १३० | १९ | अतिद्रव्यनाश । | १५० |
| ७ | सागर । | १३२ | २० | जामातृसम्भावना । | १५२ |
| ८ | नद्य । | १३३ | २१ | विचित्रो दैवयोग । | १५३ |
| ९ | कृषीवल । | १३५ | २२ | गन्तव्य सह मित्रेण । | १५५ |
| १० | पशव । | १३७ | २३ | दिलीपस्य पुत्रप्राप्ति । | १५६ |
| ११ | न्यायप्रियोऽनङ्गपाल । | १३८ | २४ | रघो राज्यप्राप्ति । | १५८ |
| १२ | मूढशिष्यस्य । | १३९ | २५ | रघुपुत्रस्याजस्य | |
| १३ | मूर्ख दास । | १४१ | | विवाह । | १६० |


### पद्यविभाग


| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | गणेश । | १६१ | ८ | सुभाषितप्रशंसा । | १६५ |
| २ | पण्डितप्रशंसा । | १६१ | ९ | सज्जनप्रशंसा । | १६६ |
| ३ | विद्याप्रशंसा । | १६२ | १० | परोपकारप्रशंसा । | १६६ |
| ४ | सामान्यनीति । | १६३ | ११ | उद्योगप्रशंसा । | १६७ |
| ५ | उदारप्रशंसा । | १६३ | १२ | सत्संगम । | १६८ |
| ६ | मूर्खवायस । | १६४ | १३ | भूमिगत धनम् । | १६८ |
| ७ | अतिदर्पोऽधःपाताय । | १६४ | | शब्दसङ्ग्रह | १६९ |


## भाग ३—मराठी उतारे (संस्कृत भाषान्तराकरितां)


| | | |
|---|---|---|
| १ | मराठीचें संस्कृत भाषांतर—भाषांतराकरिता सूचना | १७९ |
| २ | मराठी उतारे | १८३ |
| ३ | विस्तृत याद्या | १८८ |

# भाग पहिला—व्याकरण-पाठ

## प्रास्ताविक माहिती—वर्णविचार

१ **स्वर.**—अ, इ, उ, ऋ, लृ—ऱ्हस्व स्वर
आ, ई, ऊ, ॠ—दीर्घ स्वर
ए, ऐ, ओ, औ—संयुक्त दीर्घ स्वर

यांतील 'अ-आ' हे 'सजातीय' व त्यांशिवाय इतर सर्व त्यांना 'विजातीय' त्याचप्रमाणें 'इ-ई' हे सजातीय व त्यांशिवाय इतर सर्व त्यांना विजातीय तसेच 'उ-ऊ' हे सजातीय व इतर सर्व त्यांना विजातीय 'ऋ-ॠ' हे सजातीय व इतर सर्व त्यांना विजातीय

स्वरांचा उच्चार स्वतंत्र रीतीनें पूर्णपणें करतां येतो

ए, ऐ, ओ, औ हे स्वतंत्र **दीर्घ संयुक्त स्वर** आहेत म्हणून हें लक्षांत ठेविलें पाहिजे की 'ऐ' हा 'ए' चा दीर्घ स्वर नव्हे व 'औ' हा 'ओ' चा दीर्घ स्वर नव्हे ए, ऐ, ओ, औ यांपैकीं प्रत्येक स्वतंत्रपणें दीर्घ आहे

२ **व्यंजनें**—क्, ख्, ग्, घ्, ङ्—कवर्ग—कण्ठ्य व्यंजनें
च्, छ्, ज्, झ्, ञ्—चवर्ग—तालव्य ,,
ट्, ठ्, ड्, ढ्, ण्—टवर्ग—मूर्धन्य ,,
त्, थ्, द्, ध्, न्—तवर्ग—दन्त्य ,,
प्, फ्, ब्, भ्, म्—पवर्ग—ओष्ठ्य ,,

य् ( तालव्य ) व् ( ओष्ठ्य ) र् ( मूर्धन्य ), ल् ( दन्त्य ) हीं **अन्तस्थ** व्यंजनें होत ही व्यंजनें इ, उ, ऋ, लृ या स्वरांबद्दल येऊं शकतात म्हणून यांना **अर्धस्वर** असेंहि म्हणतात श् ( तालव्य ), ष् ( मूर्धन्य ), स् ( दन्त्य ), ह् ( कण्ठ्य ) हीं **ऊष्म** व्यंजनें

वरील वर्णांचा स्वतंत्रपणें पूर्ण उच्चार करतां येत नाहीं म्हणून यांना व्यंजनें म्हणतात

३ **जोडाक्षरें:**—क् + अ – क, क् + आ – का, क् + इ – कि व्यंजनांत स्वर मिळला म्हणजे पूर्णाक्षर होतें

स् + त् + र् + इ – स्त्री, स् + त् + य् + आ – स्त्या

एकाहून अधिक व्यंजनें एकत्र जोडून त्यांत स्वर मिळविला म्हणजे पूर्ण जोडाक्षर होतें जोडाक्षरांतील उच्चाराच्या वर्णानुक्रमाप्रमाणें जोडाक्षर लिहिण्याची पद्धति आहे

र् + म् + अ – र्म, ह् + व + ए – ह्वे, ह् + र् + आ – ह्रा, ह् + ण + आ – ह्णा

ज्या जोडाक्षरामध्यें 'र' हा वर्ण आहे तें लिहितांना 'र्' पहिल्यानें लिहिण्याचा प्रघात आहे.

क् + ष् – क्ष, ज् + ञ – ज्ञ अशीं विशिष्ट जोडाक्षरें लिहिण्याचा प्रघात आहे

४ **व्यंजनाचे प्रकार:**—

क्, ख्, च्, छ्, ट्, ठ्, त्, थ्, प्, फ् हीं प्रत्येक वर्गाचीं पहिलीं दोन व श्, ष्, स् हे ऊष्म वर्ण मिळून १३ **कठोर** किंवा **घोष** आहेत

ग्, घ्, ङ्, ज्, झ्, ञ्, ड्, ढ्, ण्, द्, ध्, न्, ब्, भ्, म्, य्, व्, र्, ल्, ह् हीं २० व्यंजनें **मृदु** अथवा अघोष आहेत यांत प्रत्येक वर्गाचीं शेवटचीं तीन, अन्तस्थ वर्ण, व ह् आदी येतात यांतील ङ्, ञ्, ण्, न्, म् हीं प्रत्येक वर्गांचीं शेवटील ५ व्यंजनें **अनुनासिकें** आहेत.

स्वर व व्यंजनें याशिवाय आणखी २ उच्चार उपयोगांत येतात, व ते स्वरांना जोडून लिहितात जसें अं, अः ं हें चिन्ह **अनुस्वार** दर्शवितें आणि ः हें चिन्ह **विसर्ग** दर्शवितें

टीप —१ मराठीमध्यें दीर्घ ॡ हा स्वर नाहीं त्याचप्रमाणें ळ हें व्यंजनहि नाहीं वेदांतील संस्कृतांत मात्र ळ हा वर्ण आढळतो

# पाठ १–क्रियापदें

## वर्तमानकाळ–प्रथम गण–परस्मैपद व आत्मनेपद

१ प्रथम पुरुष—अहं देवं नमामि–वन्दे ( मी देवाला नमस्कार करतों )
आवां , नमाव –वन्दावहे ( आम्ही दोघे देवाला नमस्कार करतों )
वयं , नमाम –वन्दामहे ( आम्ही–दोहोंहून अधिक–देवाला नमस्कार करतों )

द्वितीय पुरुष—त्वं देवं नमसि–वन्दसे ( तू देवाला नमस्कार करतोस )
युवां ,, नमथ –वन्देथे ( तुम्ही दोघे देवाला नमस्कार करतां )
यूयं ,, नमथ–वन्दध्वे ( तुम्ही–दोहोंहून अधिक–देवाला नमस्कार करतां )

तृतीय पुरुष—स देवं नमति–वन्दते ( तो देवाला नमस्कार करतो )
तौ ,, नमत –वन्देते ( ते दोघे ,, ,, करतात )
ते ,, नमन्ति–वन्दन्ते ( ते–दोहोंहून अधिक–देवाला नमस्कार करतात )

वरील वाक्यांत नम् व वन्द् ( नमस्कार करणें ) या धातूंचीं वर्तमानकाळचीं रूपें घातलेलीं आहेत त्यावरून पुढील गोष्टी कळून येतात —

( १ ) संस्कृतमध्यें क्रियापदाचीं तिन्ही पुरुषांचीं रूपें होतात

( २ ) संस्कृतमध्यें क्रियापदाचीं तीन वचनें आहेत—एकवचन, द्विवचन व बहुवचन अनेकवचन असा शब्द संस्कृतमध्यें उपयोगांत येत नाहीं, कारण द्विवचन हेंहि अनेकवचनच आहे कारण अनेक या शब्दावरून दोहोंचाहि बोध होऊन

(३) प्रथमपुरुषवाचक सर्वनाम—अस्मद्, द्वि० पु० वा० सर्वनाम—युष्मद्, तृ० पु० वा० सर्वनाम—तद् यांचीं प्रथमेचीं रूपें पुढीलप्रमाणें होतात—

| सर्वनाम | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| अस्मद् | अहम् | आवाम् | वयम् |
| युष्मद् | त्वम् | युवाम् | यूयम् |
| तद् | स | तौ | ते |

(४) देवम् हें देव या शब्दाचें द्वितीयेचें एकवचन कर्मपद आहे

(५) क्रियापदाचें रूप कर्तृपदाप्रमाणें पुरुष व वचन यामध्यें बदललेलें असतें.

२ रूपांचें पृथक्करण.—

(अ) नमति—नम् + अ + ति　　वन्दते—वन्द् + अ + ते
नमसि—नम् + अ + सि　　वन्दसे—वन्द् + अ + से
नमथ —नम् + अ + थस्　　वन्दध्वे—वन्द् + अ + ध्वे
नमथ —नम् + अ + थ　　वन्देथे—वन्द् + अ + इथे
नमत —नम् + अ + तस्　　वन्देते—वन्द् + अ + इते
वन्दे—वन्द् + अ + इ

(आ) नमामि—नम्+अ(आ)+मि　　वन्दावहे—वन्द् + अ (आ)+वहे
नमाव —नम्+अ(आ)+वस्　　वन्दामहे—वन्द् + अ (आ)+महे
नमाम —नम्+अ(आ)+मस्

(इ) नमन्ति—नम्+अ+अन्ति　　वन्दन्ते—वन्द् + अ + अन्ते

वरील पृथक्करणावरून पुढील प्रत्यय दिसून येतात.

| | नम् | | | वन्द् | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए० व० | द्वि० | ब० व० | ए० व० | द्वि० | ब० व० |
| प्र० पु० | मि | वस् | मस् | इ | वहे | महे |
| द्वि० पु० | सि | थस् | थ | से | इथे | ध्वे |
| तृ० पु० | ति | तस् | अन्ति | ते | इते | अन्ते |

**धातु** व **प्रत्यय** यांमध्ये सर्वत्र 'अ' हा स्वर आला आहे. याला **विकरण** म्हणतात. **नम्** आणि **वन्द्** हे प्रथम गणाचे धातु आहेत. अ हें प्रथम गणाचें विकरण होय.

**टीपः**—संस्कृतमध्ये एकंदर धातूंचे १० समूह अथवा गण केलेले आहेत, व प्रत्येक गणाची कांहीं विशिष्ट खूण असते. प्रथम गणाची खूण अथवा विकरण 'अ' आहे.

'आ' मधील प्रथमपुरुषी रूपामध्ये विकरणाच्या 'अ' चा 'आ' झाला आहे; कारण प्रत्ययांच्या आरंभी व् किंवा म् हे वर्ण आहेत.

'इ' मध्यें विकरणाच्या 'अ' चा लोप झाला आहे; कारण प्रत्ययांच्या आरंभीं 'अ' हा स्वर आहे.

**नियम १**—अन्त्य 'स्' या वर्णापुढें दुसरा वर्ण आल्यास अथवा न आल्यास त्याचा विसर्ग होतो. जसें—नमस्-वः, नमस्-मः.

**नियम २**—प्रथम पुरुषाच्या 'व्' किंवा 'म्' नें आरंभ होणाऱ्या प्रत्ययापूर्वीच्या मागील 'अ' चा 'आ' होतो.

**नियम ३**—'अ' नें आरंभ होणाऱ्या प्रत्ययापूर्वीच्या मागील 'अ' चा लोप होतो.

### ३ परस्मैपद-आत्मनेपदः—

वरील **नम्** धातूला लावलेले प्रत्यय **परस्मैपदी** आहेत व **वन्द्** धातूला लावलेले प्रत्यय **आत्मनेपदी** आहेत.

**टीपः**—संस्कृतमध्यें कांहीं धातु फक्त **परस्मैपदी**, कांहीं फक्त **आत्मनेपदी**, व कांहीं **उभयपदी** असतात. ज्या क्रियेचें फल **परस्मै** म्हणजे दुसऱ्याकरितां असतें तें क्रियापद **परस्मैपदी**, ज्या क्रियेचें फल **आत्मने** म्हणजे स्वतःकरितां असतें तें **आत्मनेपदी** व ज्या क्रियेचें फल कोणाकरितांहि असूं शकतें तें **उभयपदी** असा या शब्दाचा मूळ अर्थ आहे. परंतु सामान्यतः क्रियापदाचीं पदें ठरलेलीं आहेत. तीं त्यामुळेच ठेवलीं पाहिजेत.

यावरून असें दिसून येईल कीं धातूंचीं रूपें तयार करतांना प्रथम धातु घ्यावा, नंतर त्याला विकरण जोडून नंतर प्रत्यय जोडावा.

धातु + विकरण + प्रत्यय — इष्टरूप

## प्रथमगण—परस्मैपदी धातु

अव् (अवति), रक्ष् (रक्षति)–रक्षण करणें
क्रीड् (क्रीडति), खेल् (खेलति)–खेळणें
चल् (चलति)–चालणें, हालणें
जीव् (जीवति)–जगणें, जिवंत असणें
त्यज् (त्यजति)–सोडून देणें, टाकणें
दह् (दहति)–जाळणें, जळणें
धाव् (धावति)–धावणें
नम् (नमति)–नमस्कार करणें
पच् (पचति)–शिजविणें
पत् (पतति)–पडणें
वद् (वदति)–बोलणें
वप् (वपति)–पेरणें
*वह् (वहति)–नेणें, वाहणें

## प्रथमगण—आत्मनेपदी धातु

ईक्ष् (ईक्षते)–पाहाणें
कम्प् (कम्पते), वेप् (वेपते)–कापणें
क्षम् (क्षमते)–क्षमा करणें
भाष् (भाषते)–बोलणें
यत् (यतते)–प्रयत्न करणें
रम् (रमते)–खेळणें
लभ् (लभते)–मिळणें, मिळविणें
वन्द् (वन्दते)–नमस्कार करणें
शिक्ष् (शिक्षते)–शिकणें
स्यन्द् (स्यन्दते)–धारा पडणें, ठिबकणें
स्रंस् (स्रंसते)–गळणें, पडणें

वरील सर्व धातूंमध्यें विकरणापूर्वी फरक होत नाहीं

* ‘वह्–नेणें, उचलून नेणें’ या क्रियापदाचा उपयोग करतांना ज्या अवयवानें उचलून न्यावयाचें त्या अवयवाच्या शब्दाची तृतीया विभक्ति योजतात

---

## प्रश्न

१ इष्, एध्, क्षम्, क्रीड् या धातूंचीं वर्तमानकाळीं रूपें लिहा
२ भाषेते, वदाम, क्षमन्ते, त्यजन्ति, रमामहे या रूपांचें पृथक्करण करा.
३ पुढील वाक्यांत दिलेल्या धातूंचीं योग्य तीं वर्तमानकाळीं रूपें योजा —

बटः सायङ्काले (सन्ध्याकाले) ——— (क्रीड्)।
युवां फलं ——— (लभ्)।
रामः अपराधं ——— (क्षम्)।

नृपौ ( दोन राजे ) राज्य ——— ( रक्ष् )।
वयं सूर्यं ——— ( ईक्ष् )।
नृप सुखेन ( सुखाने ) ——— ( जीव् )।
पवन ( वारा ) गन्ध ——— ( वह् )।
आवां मार्गेण ( वाटेने ) ——— ( धाव् )।
त्वं कन्दुकेन ( चेंडूनें ) ——— ( रम् )।

---

## पाठ २—क्रियापदें ( पुढें चालू )

### ४, ६ व १० गणांतील फरक न होणारे धातु

१ (अ) मयूराः नृत्यन्ति—मोर नाचतात। रोगः न नश्यति—रोग नाश पावत नाही। सागरः क्षुभ्यति—समुद्र खवळतो। वीरः युध्यते—योद्धा लढतो। त्वम् उपायं न मन्यसे—तू उपायाचा विचार करीत नाहीस।

(आ) बालः गृहं विशति—मुलगा घरात शिरतो। योधः बाणं क्षिपति-क्षिपते—योद्धा बाण फेकतो। भक्तः देवं स्पृशति—भक्त देवाला स्पर्श करतो। अहं शब्दं लिखामि—मी शब्द लिहितो।

(इ) दूतः वार्तां कथयति-कथयते—दूत बातमी सांगतो। नरः गृहं रचयति—मनुष्य घर बांधतो। अहं शरीरं भूषयामि-भूषये—मी शरीराला शोभा आणतो। नृपः राज्यं तन्त्रयते—राजा राज्य चालवितो। सिंहः भक्ष्यं मृगयते—सिंह भक्ष्य शोधतो।

टीप—'न नहीं' हे अव्यय नुसते क्रियापदापूर्वी योजून अथवा त्या [illegible] नेहमींप्रमाणे अर्थ [illegible] वाक्याचा अर्थ [illegible]

## पृथक्करण

२ (अ) नृत्यन्ति–नृत्+य+अन्ति । नश्यति–नश्+य+ति । क्षुभ्यति–क्षुभ्+य+ति । युध्यते–युध्+य+ते । मन्यसे–मन्+य+से ।

(आ) विशति–विश्+अ+ति । क्षिपति–क्षिप्+अ+ति । क्षिपते–क्षिप्+अ+ते । स्पृशति–स्पृश्+अ+ति । लिखामि–लिख्+अ+मि ।

(इ) कथयति–कथ+अय+ति । रचयति–रच्+अय+ति । भूषयामि–भूष्+अय+मि । तन्त्रयते–तन्त्र्+अय+ते । मृगयते–मृग+अय+ते ।

अ मध्यें नृत्, नश्, क्षुभ् याना परस्मैपदी प्रत्यय लागलेले आहेत आणि युध्, मन् याना आत्मनेपदी लागलेले आहेत धातु व प्रत्यय यामध्य य हें विकरण योजलेलें आहे चतुर्थ गणाचें विकरण **य** होय

आ मध्यें विश्, स्पृश्, लिख् या धातूला परस्मैपदी व क्षिप् धातूला आत्मनेपदी प्रत्यय लागलेले आहेत षष्ठ गणाचें विकरण **अ** होय

इ मध्ये कथ्, रच्, भूष् हे धातु उभयपदी आहेत आणि तन्त्र् व मृग् हे उभयपदी आहेत दशमगणाचें विकरण **अय** आहे

**टीप** —दशम गणाचे धातु बहुधा उभयपदी असतात

### चतुर्थगण—परस्मैपद

| | |
|---|---|
| **अस्** ( अस्यति )–फेंकणें | **कुस्** ( कुस्यति ) आलिंगन देणे |
| **क्रुध्** ( क्रुध्यति ), **कुप्** ( कुप्यति )–रागावणें | **क्षुभ्** ( क्षुभ्यति )–क्षोभणे, खवळणें |
| **तुष्** ( तुष्यति )–सन्तुष्ट होणें | **नृत्** ( नृत्यति )–नाचणें |
| **नश्** ( नश्यति )–नाश होणें | **मुह्** ( मुह्यति ) मोह पावणें, वेडा होणें, मूर्च्छा येणें |
| **पुष्** ( पुष्यति )–पोषण करणें, पोसणें | **लुभ्** ( लुभ्यति )–लोभ धरणें |
| **लुप्** ( लुप्यति )–लोप होणें | |

### चतुर्थगण—आत्मनेपद

| | |
|---|---|
| **मन्** ( मन्यते )–विचार करणें, मानणें | **विद्** ( विद्यते )–असणें |
| **युध्** ( युध्यते )–लढणें | |

### षष्ठगण—परस्मैपद

इष् (इच्छति) मागणें
विश् (विशति)-शिरणें
लिख् (लिखति)-लिहिणें
तुद् (तुदति) त्रास देणें
नुद् (नुदति)-हाकणें, पुढे सारणें
स्पृश् (स्पृशति)-स्पर्श करणें, शिवणें

### षष्ठगण—उभयपद

क्षिप् (क्षिपति-क्षिपते) फेकणें

### दशमगण—उभयपद

कथ् (कथयति-ते) सांगणें
पूज् (पूजयति-ते) पूजा करणें
भूष् (भूषयति-ते) भूषविणें
स्पृह् (स्पृहयति-ते) इच्छा करणें
गण् (गणयति-ते)-मोजणें
प्रथ् (प्रथयति-ते)-प्रसिद्ध करणें
रच् (रचयति-ते)-रचणें, बांधणें

### दशमगण—आत्मनेपद

मन्त्र् (मन्त्रयते)-एकत्र विचार करणें, ठरविणें
तन्त्र् (तन्त्रयते) चालविणें (राज्य)
मृग् (मृगयते)-शोधणें, शिकार करणें

**टीप**—क्षम्, धृ-धारण या धातूंचा उपयोग ज्याच्याबद्दल काही धारण करावयाचें त्याची सप्तमी योजून करतात.

क्रुध्-द्रुह्-रागावणें या धातूंचा उपयोग ज्याच्यावर रागवावयाचें त्याला चतुर्थी योजून करतात.

स्पृह्-इच्छा करणें या धातूचा उपयोग ज्याची इच्छा करावयाची त्याला चतुर्थी योजून करतात (हा धातु सम्प्रदानार्थ अकर्मक आहे)

कथ्-सांगणें या धातूचा उपयोग ज्याला सांगावयाचें त्याची चतुर्थी योजून करतात कधीं कधीं द्वितीया किंवा षष्ठीही योजतात

### प्रश्न

१ ४, ६ व १० या गणांचे दोन्ही पदांमध्यें प्रत्येकी दोन दोन धातु चालवा

२ पुढील रूपांचें पृथक्करण करा —कुप्यत, युध्येते, मृगयन्ते, मुष्णाम, मन्ये

३ पुढील वाक्यांत दिलेल्या धातूंचीं रूपें घाला —

योधौ (दोन योद्धे) ——— (युध्)। अहं सेवकाय (सेवकावर) ——— (कुप्)।
वयं कन्दुकं (चेंडू) ——— (क्षिप्)।
त्वं हर्षेण (आनन्दानें) ——— (नृत्)। यूयं धनं ——— (लुभ्)।
नृपाः (राजे) विजयाय (जयाबद्दल) ——— (स्पृह्)। आवां क्षेत्रं (शेत) ——— (कृष्)।
स पुत्रं ——— (कुप्)।
शुना फलानि (फळें) ——— (मण्)।

---

## पाठ ३—नामें

### अकारान्त—पुंलिंगी व नपुंसकलिंगी

१ नृपः राज्यं रक्षति—राजा राज्याचें रक्षण करतो

प्रभाते भक्तः हस्ताभ्यां देवं नमति—सकाळीं भक्त देवाला हातांनीं नमस्कार करतो

वीरः रथात् बाणं क्षिपति—योद्धा रथांतून बाण फेंकतो

उद्याने मालाकारः वृक्षान् जलेन पुष्यति—बागेंत माळी झाडांना पाण्यानें पोसतो

ईश्वरस्य प्रसादेन नरः सुखं लभते—ईश्वराच्या कृपेनें मनुष्याला सुख मिळतें

जनकः बालकाय पुस्तकं यच्छति—बाप मुलाला पुस्तक देतो

छात्राः अध्ययनाय यतन्ते—विद्यार्थी शिकण्याचा यत्न करितात

**हे वयस्य, बालः कन्दुकेन क्रीडति**—हे मित्रा, मुलगा चेंडूनें खेळतो

वरील वाक्यातील अकारान्त नामाच्या विभक्ति व त्याचे अर्थ पुढीलप्रमाणें आहेत

| शब्द | | विभक्ति अर्थ |
|---|---|---|
| नृप, भक्त, वीर, मालाकार<br>नर, छात्र, जनक, बाल | पु | प्रथमा—कर्तृपदें |
| राज्यम्, सुखम्, पुस्तकम्<br>देवम् (देव), वृक्षान् (वृक्ष) | न.<br>पु | द्वितीया—कर्मपदें |
| हस्तेन (हस्त), प्रसादेन (प्रसाद)<br>कन्दुकेन (कन्दुक) | पु | तृतीया—करण किंवा साधन |
| बालकाय (बालक) | पु | चतुर्थी—ज्याला द्यावयाचें तो—संप्रदान |
| अध्ययनाय (अध्ययनम्) | न. | ,, —ज्याच्याकरिता क्रिया घडते तें—प्रयोजन |
| रथात् (रथ) | पु | पंचमी—ज्याच्यापासून दूर क्रिया घडते तो—अपादान |
| ईश्वरस्य (ईश्वर) | पु | षष्ठी—संबंध |
| उद्याने (उद्यानम्) | न | सप्तमी—क्रियेचा आधार—अधिकरण |
| प्रभाते (प्रभातम्) | न. | ,, —क्रियेची वेळ अधिकरण |
| वयस्य (वयस्य) | पु | संबोधन—ज्याला हाक मारली तो |

यावरून ध्यानांत येईल की, निरनिराळ्या विभक्तींचे अर्थ मराठींत व संस्कृतांत सारखेच आहेत.

**२ अकारान्तः पुंलिङ्गः देवशब्दः। अकारान्तः नपुंसकलिङ्गः वनशब्दः।**

| एकव० | द्विव० | बहुव० | | एकव० | द्विव० | बहुव० |
|---|---|---|---|---|---|---|
| देव | देवौ | देवाः | प्रथमा | वनम् | वने | वनानि |
| देवम् | ,, | देवान् | द्वितीया | ,, | ,, | ,, |
| देवेन | देवाभ्याम् | देवैः | तृतीया | वनेन | वनाभ्याम् | वनैः |

| एकव० | द्विव० | बहुव० | | एकव० | द्विव० | बहुव० |
|---|---|---|---|---|---|---|
| देवाय | देवाभ्याम् | देवेभ्य | चतुर्थी | वनाय | वनाभ्याम् | वनेभ्य |
| देवात् | ,, | ,, | पञ्चमी | वनात् | ,, | ,, |
| देवस्य | देवयो | देवानाम् | षष्ठी | वनस्य | वनयो | वनानाम् |
| देवे | ,, | देवेषु | सप्तमी | वने | ,, | वनेषु |
| हे देव | हे देवौ | हे देवा | सम्बोधन | हे वन | हे वने | हे वनानि |

वरील रूपें पाहिल्यास असें दिसून येईल की पु. व न. नामांच्या रूपांमध्यें प्रथमा, द्वितीया व सम्बोधन या विभक्तींतच फरक आहे. इतर विभक्तींची रूपें सारखीच आहेत.

'अ'कारान्त पुल्लिंगी नामें 'देव' प्रमाणें चालवावीं आणि नपुंसकलिंगी 'वन' प्रमाणें चालवावीं.

टीप —शब्दसमूहाचे अ व आ असे दोन भाग केलेले आहेत. अमध्ये संस्कृत व मराठी या भाषांत सारखे असलेले शब्द व आमध्यें संस्कृत शब्द मराठी अर्थांसह दिलेले आहेत.

देवप्रमाणें चालणारे अकारान्त पुल्लिंगी शब्द —

(अ) अपराध, उदय, जन, भाव, तट, वार, बालक, देव, पर्वत

(आ) अनलः—विस्तव, अनिलः-पवनः—वारा, अश्वः-हय —घोडा, उद्यमः—उद्योगः, कायः-देहः—शरीर, कृषीवलः—शेतकरी, खगः-विहग -विहङ्गमः—पक्षी, चरणः-पादः—पाय, जनकः—बाप, पाठः—धडा, सैनिकः—शिपाई, वत्सः—वासरूं, मूल

वनप्रमाणें चालणारे अकारान्त नपुंसकलिंगी शब्द —

(अ) अञ्जनम्, धनम्, अरण्यम्, आकाशम्, आसनम्, चन्दनम्, ज्ञानम्, तारणम्, दुःखम्, धान्यम्, नगरम्, पापम्, पुण्यम्, पुस्तकम्, रत्नम्, वनम्, हृदयम्

(आ) उपवनम्-उद्यानम्—बाग, कुसुमम्—फूल, कुण्डलम्—कानातील भूषण, क्रीडाङ्गणम्—खेळण्याची जागा, गेहम्-

सद्नम्—घर, चित्तम्—मन, तीर्थम्—पवित्रस्थान, तृणम्—गवत, नयनम्—डोळा, नीडम्—घरटे, बीजम्—बी, भाषणम्-वचनम्—बोलणें, मुखम्-आननम्—तोंड, सुवर्णम् काञ्चनम्-हिरण्यम्—सोने

३

| | तृतीया एकवचन | षष्ठी बहुवचन | | द्वितीया बहुवचन |
|---|---|---|---|---|
| (अ) | राम —रामेण | रामाणाम् | परंतु | रामान् |
| | वृष —वृषेण | वृषाणाम् | ,, | वृषान् |
| | शेष —शेषेण | शेषाणाम् | ,, | शेषान् |
| | वृक —वृकेण | वृकाणाम् | ,, | वृकान् |
| (आ) | वण —वणन | वणानाम् | आणि | वणान् |
| | चरण —चरणन | चरणानाम् | ,, | चरणान् |

'अ'मध्ये ज्या ठिकाणी देव शब्दाचे रूपात 'न्' होता त्या ठिकाणी 'ण्' झाला आहे परंतु आ मध्ये 'न्'च कायम राहिला आहे द्वितीयेच्या बहुवचनातील अन्त्य 'न्' दोन्ही ठिकाणी तसाच राहिला आहे

वरील रूपांच्या पृथक्करणाची तुलना केली असता असें दिसून येईल की मूळ शब्दामध्यें ऋ, र्, ष् यांपैकी एखादा वर्ण असेल तर शब्दाच्या रूपामध्ये येणाऱ्या 'न्' चा 'ण' होतो मात्र ऋ, र्, ष, आणि न् यामध्यें कोणताहि स्वर, ह खेरीज अन्त स्थ वर्ण, कवर्ग व पवर्ग यातील व्यञ्जनें व ह् यांशिवाय अन्य वर्ण येता कामा नये द्वितीयेच्या बहुवचनी रूपावरून असें दिसून येईल की वरील प्रकार 'न्' हा शब्दाने रूपाचे शेवटी आल्यास होत नाही।

पृथक्करण

वृषेण—व ऋ ष् ए+न्+अ
शेषेण—श् ए ष् ए+न्+अ
रामेण—र् आ म् ए+न्+अ
} परंतु वणन—व अ र् ण् ए+न्+अ

वरील 'न्'चा 'ण्' करण्याचा नियम अकारान्त नपुंसकलिंगी नामांच्या प्रथमा, द्वितीया, संबोधन यांच्या बहुवचनांत आणि तृतीया एकवचन व षष्ठी बहुवचन यामध्यें अमलांत आणला जेल

जसें—पुष्पम्–पुष्पाणि, पुष्पेण, पुष्पाणाम्
नेत्रम्–नेत्राणि, नेत्रेण, नेत्राणाम्

परंतु तृणम्–तृणानि, तृणेन, तृणानाम्
हृदयम्–हृदयानि, हृदयेन, हृदयानाम्

पुढील शब्द वरील नियमाप्रमाणे चालविता येतील —

पुल्लिंगी —

( अ ) ईश्वर , पुत्र , मूर्ख , चन्द्र , सूर्य , खग , पुरुष , शिष्य , आकाश , शङ्कर , राम , क्रम , आर्य , आश्रम , समुद्र

( आ ) **वृक्ष** —झाड, **कूर्म** —कासव, **नृप** —राजा, **किङ्कर**.—चाकर, **भार**.—ओझें, **शर**.—बाण, **सदाचार**.—चांगलें वर्तन, **छात्र**.—शिष्य, **कर**.—हात

नपुंसकलिंगी —

( अ ) मित्रम्, शरीरम्,

( आ ) **क्षेत्रम्**—शेत **गृहम्**—घर, **नेत्रम्**—डोळा, **पुष्पम्**—फूल, **शीर्षम्**—डोकें

**टीप** —संस्कृतमध्यें सामान्यतः शब्दाचें लिंग अर्थावरून ठरविता येतात परंतु कांहीं शब्दांचीं लिंगे मात्र मराठी भिन्न आहेत जसें—मित्र (पु), मित्रम् (न), वस्तु (न), राशि (पु), व्याधि (पु), अश्रु (न), देवालय (पु), कर (पु) म्हणून नामाचीं लिंगे पाठ केलींच पाहिजेत विशेष माहिती संस्कृत वाक्यरचना पाठ २ मध्यें पहा

---

## प्रश्न

१ पुढील वाक्यात कंसातील शब्दांचीं योग्य रूपें योजा —

| | | | |
|---|---|---|---|
| १ नर | ( मुख ) | ( अन्न ) | भक्षयति । |
| २ बाल | ( आकाश ) | ( चन्द्र ) | ईक्षते । |
| ३ जनक | ( पुत्र ) | ( सदाचार ) | तुष्यति । |
| ४ नरा | ( श्रम ) | ( धन ) | लभन्ते । |

वरील वाक्यामध्यें गम्, दा, हे प्रथम गणाचे परस्मैपदी, शम् चतुर्थगण परस्मैपदी, जन् चतुर्थगण आत्मनेपदी, विद् षष्ठगण उभयपदी, व प्री दशमगण उभयपदी धातु योजलेले आहेत. या धातूंमध्यें विकरणांपूर्वी अनियमित फरक होतो.

गम्–गच्छ्+अ+ति–गच्छति। जन्–जा+य+ते–जायते।

विद्–विन्द्+अ+ति–विन्दति। प्री–प्रीण्+अय+ते–प्रीणयते।

२ अशा प्रकारचे धातु पुढें दिले आहेत.

(१) प्रथम गण–परस्मैपद—ऋ (ऋच्छति)—जाणें, गम् (गच्छति)–जाणें, घ्रा (जिघ्रति)—वास घेणें, दा (यच्छति)—देणें, दृश् (पश्यति)—पाहाणें, ध्मा (धमति)—फुंकणें, वाजवणें, पा (पिबति)—पिणें.

आत्मनेपद—शद् (शीयते)—नाश पावणें.

(२) चतुर्थ गण–परस्मैपद—क्लम् (क्लाम्यति)—थकून जाणें, क्षम् (क्षाम्यति)—क्षमा करणें, जॄ (जीर्यति)—वृद्ध होणें, दुर्बल होणें, दम् (दाम्यति)—ताब्यात ठेवणें, नियंत्रण ठेवणें, भ्रम् (भ्राम्यति)—भटकणें, फिरणें (भ्रमति–भ्रम्यति अशीं रूपेंहि होतात), व्यध् (विध्यति)—टुपसणें, शम् (शाम्यति)—शान्त होणें, कमी होणें, श्रम् (श्राम्यति)—थकणें, दमून जाणें.

आत्मनेपद—जन् (जायते)—उत्पन्न होणें, जन्माला येणें.

(३) षष्ठगण–परस्मैपद—इष् (इच्छति)—इच्छा करणें, कृत् (कृन्तति)–तोडणें, कुरतुडणें, कॄ (किरति)—पसरणें, पसरविणें, नू (नुवति)—स्तुति करणें, प्रच्छ् (पृच्छति)—विचारणें, मस्ज् (मज्जति)—बुडणें, बुडी मारणें.

आत्मनेपद—मृ (म्रियते)—मरणें, धृ (ध्रियते)—अस्तित्वात असणे

उभयपद—मुच् (मुञ्चति-ते)—सोडणें, सोडविणें, लिप् (लिम्पति-ते)—लेप देणें, सारवणें, लुप् (लुम्पति-ते)—लुबाडणें, विद् (विन्दति-ते)—मिळणें, मिळविणें, सिच् (सिञ्चति-ते)—शिंपडणें.

(४) दशम गण उभयपद—कृत् ( कीर्तयति-ते )-सांगणें, वर्णन करणें, धृ ( धूनयति-ते )-हालविणें, प्री ( प्रीणयति-ते )-संतुष्ट करणें, मृज् ( मार्जयति-ते )-सडा घालणें, स्वच्छ करणें

३ इतर गणाच्या कांही महत्त्वाच्या धातूंची रूपें—

अस्—असणें-द्वितीयगण प. प.

अस्मि स्व स्म । असि स्थ स्थ । अस्ति स्त सन्ति ।

कृ—करणें-अष्टम गण उ. प. ( फक्त परस्मैपदी रूपें दिलीं आहेत )

करोमि कुर्वः कुर्मः । करोषि कुरुथः कुरुथ । करोति कुरुतः कुर्वन्ति ।

ज्ञा—जाणणें-नवम गण. उ. प. ( फक्त प. पदी रूपें दिलीं आहेत )

जानामि जानीवः जानीमः । जानासि जानीथः जानीथ । जानाति जानीतः जानन्ति ।

ग्रह्—घेणें-पकडणें-नवम गण उ. प. ( फक्त प. पदी रूपें दिलीं आहेत )

गृह्णामि गृह्णीवः गृह्णीमः । गृह्णासि गृह्णीथः गृह्णीथ । गृह्णाति गृह्णीतः गृह्णन्ति ।

श्रु ( शृ ) ऐकणें-पञ्चम गण परस्मैपद—

शृणोमि शृणुवः शृणुमः । शृणोषि शृणुथः शृणुथ । शृणोति शृणुतः शृण्वन्ति ।
शृण्वः शृण्मः ।

टीप —( १ ) गत्यर्थक क्रियापदाचा उपयोग स्थलवाचक शब्दाची द्वितीया योजून करितात

( २ ) 'दा-यच्छ्-देणें' या क्रियापदाचा उपयोग ज्याला द्यावयाचें त्या अर्थाच्या शब्दाची चतुर्थी योजून करतात

( ३ ) 'जन् ( जा )-उत्पन्न होणें' या क्रियापदाचा उपयोग ज्यापासून उत्पत्ति होते त्या शब्दाची पंचमी योजून करतात

## नवीन शब्द

( अ ) चोर, धनम्, पराक्रम, ग्रन्थ, बाण, राक्षस, वस्त्रम्, सह, हरिण

| ( आ ) गन्धः—सुवास | जालम्—जाळें | रणाङ्गणम्—युद्धाची जागा |
| --- | --- | --- |
| यानम्—वाहन | तण्डुलः—तांदूळ | |

## प्रश्न

१ पुढील वाक्यांतील क्रियापदांतील मूळ धातु सांगून त्याचा पुरुष व वचन सांगा आणि योग्य तीं कर्तृपदें योजा.—

१ ——— बाणैः हरिणं विध्यथ ।
२ ——— रणाङ्गणे तिष्ठन्ति ।
३ ——— पुष्पाणि पश्यामि ।
४ ——— राक्षसेन सह युध्यसे ।
५ ——— तण्डुलान् किरति ।
६ ——— ईश्वरं प्रणिपततः ।
७ ——— वृक्षान् जलेन सिञ्चतः ।
८ ——— अपराधं क्षाम्यामः ।
९ ——— कीर्तिमार्गं परान्नमम् ।
१० ——— शरीरं भूषयन्ति ।

२ खालीं दिलेल्या क्रियापदाला योग्य होतील तीं कर्तृपदें योजा व दुसऱ्या समूहांतील शब्दांपैकीं योग्य तीं कर्मपदें योजा.

क्रियापदसमूहः—इच्छन्ति, पृच्छामि, यच्छतः, धमामः, जिघ्रसि, स्मरावः, मुञ्चथ, प्रीणयन्ति, शृणुथ, धूनयति.

कर्मपदसमूहः—अश्वम्, शङ्खम्, गन्धम्, जालम्, चौरम्, जनकम्, सुराम्, धनम्, गानम्, वस्त्रम्.

---

# पाठ ५—क्रियापदें (नियमित फरक होणारीं).

१ गुण-प्रथमगणः—

* **ईश्वराय पूजनं रोचते**—ईश्वराला पूजा आवडते.
† **ज्ञानं मोक्षाय कल्पते**—ज्ञान मोक्षाला योग्य असतें (मोक्षप्रत नेतें).

---

* रुच् (आवडणें) या क्रियापदाचा उपयोग ज्याला काहीं आवडतें त्याची चतुर्थी योजून व जें आवडतें त्याची प्रथमा योजून करितात.

† कृप् (योग्य असणें, परिणाम होणें) या क्रियापदाचा उपयोग ज्याविषयीं योग्य त्या शब्दाची अथवा परिणामवाचक शब्दाची चतुर्थी विभक्ति योजून करितात.

पर्वते वृक्षाः रोहन्ति—पर्वतावर झाडें वाढतात
वातः सुगन्धं हरति—वारा सुवास नेतो.
योधः विपक्षं जयति—योद्धा शत्रूला जिंकतो
रामः पण्डितः भवति—राम विद्वान् होतो.
दानेन पुण्यं वर्धते—दानानें पुण्य वाढतें
नाविकः समुद्रं तरति—नावाडी समुद्र तरून जातो

वरील वाक्यांत रुच्, क्लृप्, रुह्, हृ, जि, भू, वृध्, तॄ या प्रथम गणाच्या धातूंची रूपें योजलेली आहेत त्यामध्यें विकरणापूर्वी कांहीं नियमित फरक झाला आहे.

रुच्–रोच्+अ+ते–रोचते। रुह्–रोह्+अ+ति–रोहति।
वृध–वर्ध्+अ+ते–वर्धते। क्लृप्–कल्प्+अ+ते–कल्पते।
हृ–हर्+अ+ति–हरति। जि–जे (जय्*)+अ+ति–जयति।
भू–भो (भव*)+अ+ति–भवति। तॄ–तर्+अ+ति–तरति।

वरील रूपांत उपान्त्य ह्रस्व उ, ऋ, लृ बद्दल विकरणापूर्वी ओ, अर्, अल् असा फरक झाला आहे व अन्त्य इ, ऊ, ऋ–ॠ बद्दल ए, ओ, अर् असा फरक झाला आहे हा फरकाला **गुण** म्हणतात.

## गुण

| मूळ स्वर | इ–ई | उ–ऊ | ऋ–ॠ | लृ |
|---|---|---|---|---|
| फरक | ए | ओ | अर् | अल् |

*धातूला विकरण जोडतांना ए, ऐ, ओ, औ यापुढे स्वर आला तर त्याचा अनुक्रमे अय्, आय्, अव्, आव् असा फरक होतो, व त्यांतील य् आणि व् हीं व्यञ्जनें पुढील स्वरांत मिळून पूर्णाक्षर होतें असा तऱ्हेचीं रूपें होणारे कांहीं धातु—

गै–(गाय्+अ+ति–गायति)—गाणें, ग्लै–(ग्लायति)—ग्लानि

येण, त्रै-( त्रायते )—रक्षण करण, म्लै-( म्लायति )—म्लान होणें, ह्वे-( ह्वयति )—बोलवणें.

गुण फरक होणाऱ्या प्रथम गणाचीं क्रियापदें:—

प प —कृष् ( कर्षति )—ओढणें, क्षि-क्षे ( क्षयति )—क्षयी होणें, जि-जे ( जयति )—जिंकणें, तृ ( तरति )—तरून जाणें, द्रु-द्रो ( द्रवति )—पाझरणें, पातळ होणें, नी-ने ( नयति )—नेणें, बुध् ( बोधति )—जाणणें, भू-भो ( भवति )—होणें, रुह् ( रोहति )—वाढणें, सृ ( सरति )—हालणें, स्मृ ( स्मरति )—आठवणें, हृ ( हरति )—नेणें, हरण करणें

आ प —कृप्-कल्प् ( कल्पते )—योग्य असणें, परिणाम होण, डी-डे-डय् ( डयते )—उडणें, द्युत् ( द्योतते )—प्रकाशणें, चकाकणें, मुद् ( मोदते )—आनंदित होण, वृत् ( वर्तते )—असणें, वागणें, वृध् ( वर्धते )—वाढणें, शुभ् ( शोभते )—शोभणें.

नियम.—प्रथम गणाच्या विकरणापूर्वी धातूच्या अन्त्य इ, उ, ऋ, ऌ या ह्रस्व अथवा दीर्घ स्वराचा आणि उपान्त्य इ, उ, ऋ ऌ या ह्रस्व स्वराचा गुण रूपी फरक होतो

२ गुण—दशम गण —

चोरः धनं चोरयति—चोर द्रव्य चोरतो

सुवर्णकारः सुवर्ण तोलयति—सोनार सोनें तोलतो

सैनिकः नृपस्य शासनं घोषयति—शिपाई राजाचा हुकूम मोठ्यानें सांगतो

सूतः अश्वान् चोदयति—सारथि घोडे हाकतो

वरील वाक्यातील चुर्, तुल्, घुष्, चुद् या दशम गणाच्या क्रियापदांतहि उपान्त्य ह्रस्व स्वराचा 'अय' या विकरणापूर्वी गुणरूपी फरक झालेला आहे जसें— चुर्-चोर्+अय+ति-चोरयति ।

नियमः—दशम गणाच्या धातूंतील उपान्त्य ह्रस्व इ, उ, ऋ, ऌ या स्वराचा

गुण फरक होतो मात्र स्पृह आणि मृग हे अपवाद आहेत असें—स्पृहयति मृगयते

टीप —चतुर्थ व षष्ठ गणाच्या धातूंमध्यें गुण फरक होत नाहीं

३ वृद्धि—दशम गण.—

बाल मण्डूकं ताडयति—मुलगा बेडकाला मारतो

,, हस्तं क्षालयति जलेन —मुलगा पाण्यानं हात धुतो

अलङ्कारान् धारयति बाल. शरीरे —मुलगा दागिने अंगावर घालतो.

नर रोगेण जारयति†—मनुष्य रोगानें म्हातारा होतो

नर दानं पुण्यं भावयति†—मनुष्य दानाला पुण्य मानतो

वरील पांच वाक्यांत तड्, क्षल्, धृ, जॄ, भू ह्या दशम गणाच्या क्रियापदें योजलेली आहेत त्यांतील उपान्त्य 'अ' चा अग पूर्वी 'आ' झाला आहे, व अन्त्य 'ऋ, ॠ, ऊ' यांचा 'आर्, आर्, औ (आव्)' असा फरक झाला आहे या फरकाला वृद्धि म्हणतात

'वृद्धि'

| मूळ स्वर | अ | इ–ई | उ–ऊ | ऋ–ॠ | ऌ |
|---|---|---|---|---|---|
| फरक | आ | ऐ | औ | आर् | आल् |

नियम —दशम गणाच्या धातूंच्या अन्त्य इ, उ, ऋ व ऌ या ह्रस्व किंवा दीर्घ स्वराचा व उपान्त्य 'अ' या स्वराचा विकरणापूर्वी वृद्धिरूपी फरक होतो अपवाद—कथ् (कथयति), गण्, रच, ग्रथ्, चि (चपयति–चययति)

* संस्कृतमध्यें एकाच साऱ्या वाक्यांतील शब्दांची रचना सामान्यत कशीहि केली तरी चालते संस्कृत-वाक्यरचना पाठ ४ पहा

† ही क्रियापदें फारशीं उपयोगांत येत नाहींत नियम समजण्याकरितां दिलीं आहेत

४ दशम गणाच्या धातूंच्या रूपांसारखीं मूळ धातूंपासून तयार होणारीं कांहीं क्रियापदें.

पुत्रः जनकं कोपयति—मुलगा वापाला राग आणतो.

शिक्षकः छात्रान् शिक्षयति—शिक्षक विद्यार्थ्यांना शिकवितो

आलस्यं दारिद्र्यं वर्धयति—आळस गरिबी वाढवितो.

वरील वाक्यात कुप् पासून कोपय, शिक्ष् पासून शिक्षय, वृध् पासून वर्धय अशा मूळ धातूंना दशम गणाप्रमाणें 'अय' जोडून व 'अय' पूर्वी सामान्यत दशम गणासारखेच फरक करून क्रियापदें तयार केलेली आहेत याचा अर्थ मूळ धातूनें दर्शविलेली क्रिया करविणें असा होतो याना प्रयोजक क्रियापदें म्हणतात.

सतर्मक त हेनें उपयोगात येणारीं आपल्ली काहीं प्रयोजक क्रियापदें —

ऋ–अर्पय (अर्पण करणें), क्षुभ्–क्षोभय (प्रक्षुब्ध करणें), तुष्–तोषय (सन्तुष्ट करणें), दृश्–दर्शय (दाखविणें), नश्–नाशय (नाश करणें), मृ–मारय (मारणें), स्था–स्थापय (ठेवणें)

## नवीन शब्द

(अ) इन्द्र, उपदेश, गन्धर्व, तत्त्वम्, दानम्, बिम्बम्, मार्ग, मोक्ष, रोग, वस्त्रम्, वानर, विजय, वेग, सख्यम्।

(आ) अलङ्कारः—दागिना, आलस्यम्—आळस, कृष्णपक्षः—महिन्याचा दुसरा पंधरवडा, दण्डः—काठी, दारिद्र्यम्—गरिबी, नाविकः—नावाडी, न्यायः—न्यायनीति, पूजनम्—पूजा, मण्डूकः—बेडूक, विनोदः—करमणूक, विपक्षः—शत्रु, सुगन्धः—चांगला वास, सुवर्णकारः—सोनार, शासनम्—आज्ञा, हुकूम

---

## प्रश्न

१ गुण व वृद्धि म्हणजे काय हें सोदाहरण सांगा प्रथम गणातील धातूना गुण–फरक केव्हां होतो ? दशम गणाच्या धातूमध्यें कोणते फरक होतात ?

२ कंसातील शब्दांचीं योग्य तीं रूपें योजून वाक्यें पुरीं करा —

१ (वानर) फलानि (स्वद्)।
२ नरा (शरार) वस्त्राणि (धृ)।
३ अह (जल) पादौ (क्षल)।
४ यूय सङ्कटात् (मित्र) (त्रै)।
५ वय (नृप) विनय (दृप)।
६ चन्द्रस्य (प्रकाश) वृक्षा (द्युत्)
७ नृप (सैनिक) रणाङ्गण (नी)
८ त्व (अलङ्कार) (शुभ)।
९ स्वर्गे गन्धर्वा (इन्द्र) विनोदाय (गै)।
१० रामा (आकाश) वेगेन (डी)।

३ पुढील रूपें काय आहेत ते सांगून त्यांचा दिलेल्या वाक्यांत उपयोग करा —स्पृशाम, कथयत वर्धेत, कल्पस, क्षयति, बोधय, नयन्ति इवनि ताडयाव, चोरयति।

१ अश्वी रथ मार्गेण ———।
२ स्तेन धनिकस्य धन ———।
३ कृष्णपक्षे चन्द्रस्य बिम्ब ———।
४ वय ——— जनकस्य उपदेशम्।
५ उद्यमेन नरस्य धन ———।
६ त्व लोकस्य कल्याणाय ———।
७ यूय न्यायस्य तत्त्वानि ———।
८ कृपावत्ता करावदोन् क्षेत्राणि ———।
९ सज्जनस्य हृदय दु खेन ———।
१० आवाम् ——— दण्डेन चोरम्।

---

# पाठ ६—आकारान्त व ईकारान्त स्त्रीलिंगी नामें.

१ वापीषु (विहिरींत) जलं वर्तते। जलस्य पानेन तृष्णा (तहान) शाम्यति। पाठशालाया (शाळेंतून) कुमारा कुमार्य (मुली) च गृह गच्छन्ति। भक्ता पुष्पाणा मालाभि (माळांनीं) ईश्वर पूजयन्ति। ईश्वर पूजया (पूजेनें) तुष्यति। राज्ञ्या (राणीची) सेवा कुर्वन्ति दास्य (दासी)। गङ्गा ब्रह्मपुत्रा यमुना गोदावरी नर्मदा कृष्णा च (आणि) नद्य (नद्या) भारतवर्षे विद्यन्ते। कन्याभ्य (मुलींना) यच्छति अलङ्कारान् जनक। ज्योत्स्नाया (चन्द्रप्रकाशांत) जना उद्याने रमन्ते। हे सरस्वति देवि अहं त्वा नमामि।

वरील वाक्यांत आकारान्त व ईकारान्त स्त्रीलिंगी नामांचीं निरनिराळ्या विभक्तींचीं रूपें आलेलीं आहेत तीं पुढें दिलेल्या **माला** व **नदी** शब्दांच्या रूपांप्रमाणें होतात

**२ आकारान्तः स्त्रीलिङ्गः मालाशब्दः। ईकारान्तः स्त्रीलिङ्गः नदीशब्दः।**

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| माला | माले | माला | प्र | नदी | नद्यौ | नद्य |
| मालाम् | ,, | ,, | द्वि. | नदीम् | ,, | नदी |
| मालया | मालाभ्याम् | मालाभि | तृ | नद्या | नदीभ्याम् | नदीभि |
| मालायै | ,, | मालाभ्य | च | नद्यै | ,, | नदीभ्य |
| मालाया | ,, | ,, | प | नद्या | ,, | ,, |
| ,, | मालयो | मालानाम् | ष | नद्या | नद्यो | नदीनाम् |
| मालायाम् | ,, | मालासु * | स | नद्याम् | ,, | नदीषु * |
| हे माले | हे माले | हे माला | स | हे नदि | हे नद्यौ | हे नद्य |

* सप्तमी बहुवचनांत आकारान्त शब्दाच्या रूपांत 'सु' हा प्रत्यय आहे व ईकारान्त शब्दाच्या रूपांत तो 'षु' झाला आहे

*नियम —'स्' च्या पूर्वी अ-आ सोडून स्वर, कवर्ग आणि [illegible] यांचीं व्यंजनें, किंवा र् हे वर्ण आल्यास 'स्' चा बहुधा 'ष्' होतो*

आकारान्त व ईकारान्त स्त्री नामांचीं रूपें 'माला व नदी' या शब्दांप्रमाणें करावीं परंतु षष्ठी-बहुवचनांत 'न्' चा 'ण्' होतो कीं काय हें पाहिलें पाहिजे

## आकारान्त नामें ( स्त्रीलिंगी )

(अ) आशा, इच्छा, कृपा, क्रिया, क्षमा, दया, दशा, पूजा, भाषा, विद्या, सेवा

(आ)

| | | |
|---|---|---|
| कथा-गोष्ट | नासिका-नाक | प्रमदा-तरुण स्त्री |
| क्रीडा-खेळ | निशा क्षपा-रात्र | भार्या-बायको |
| क्षुधा-भूक | नौका-होडी | माला-माळ |
| जिह्वा रसना-जीभ | पाठशाला-शाळा | लता-वेल |
| तृष्णा-तहान | बाला कन्या-मुलगी | ललना-स्त्री |

वसुधा वसुन्धरा-पृथ्वी

## ईकारान्त नामें (स्त्रीलिंगी)

(अ) दासी नदी पृथ्वी

| | | |
|---|---|---|
| (आ) कुमारी–मुलगी | भगिनी–बहीण | राज्ञी–राणी |
| कौमुदी–चन्द्रप्रकाश | मही उर्वी पृथ्वी | सर्पी विष |
| जननी आई | रजनी–विभावरी, शर्वरी }–रात्र | |

टीप —लक्ष्मी तरी (होडी) तन्त्री (तन्तुवाद्य) ह्या ईकारान्त आलेल्या शब्दांची प्रथमा एकवचनी रूपें लक्ष्मीः तरीः तन्त्रीः अशीं होतात

## नवीन शब्द

| | | |
|---|---|---|
| (आ) अतिशय –अतिरेक | खलु (अ)–खरोखर | भारतवर्षम् हिंदुस्थान देश |
| अध्यापक –शिक्षक | दूत दूत निरोप नेणारा | भृत्य –नोकर |
| आपणम् बाजार | निशाचर –राक्षस | रस गाणें चव |
| उद्भव –उत्पत्ति | पानम् पिणें | सूच् (१० उ प) –सुचविणे |
| ऊह् (१प प ऊहति) तर्क करणें | पारितोषिकम् बक्षीस | |

## सन्धिनियम

संस्कृतमध्ये वाक्यातील शब्द विवक्षित नियमाप्रमाणें जोडून लिहिण्याची पद्धति आहे दोन अथवा अधिक शब्दांचा समूह अथवा समास करतांना सुद्धा ते शब्द एकमेकांना जोडून लिहिले पाहिजेत अशा पद्धतीला सन्धि करून लिहिणें असे म्हणतात तसेच धातूला उपसर्ग जोडतांना संधि करावा लागतो संधीचे पुढील प्रकार होतात

१ स्वर+स्वर २ विसर्ग+स्वर ३ विसर्ग+व्यञ्जन ४ व्यञ्जन+स्वर, ५ व्यञ्जन+व्यञ्जन

(१) दूत नगर आगमन करोति—नेपनागमन   अ+आ=आ

*माधवा आनन्दं सूचयति नृपः—माधवानन्दं ... आ+आ–आ

क्रोधेन अनलं क्षिपति गृहे—क्रोधेनानलं ... अ+अ–आ

(आ) राज्ञी ईक्षते उद्यानम्—राज्ञीक्षते ... ई+ई–ई

पृथ्वीं रक्षति ईश्वरः—रक्षतीश्वरः ... इ+ई–ई

दासी इच्छति पारितोषिकम्—दासीच्छति ... ई+इ–ई

(इ) अश्रु उद्भवति नेत्रे—अश्रूद्भवति ... उ+उ–ऊ

† न्यायाधीशः खलु ऊहते अपराधम्—खलूहते ... उ+ऊ–ऊ

शरयू+उद्भवः—(सामासिक शब्द)—शरयूद्भवः ऊ+उ–ऊ

(ई) पितृ+ऋणम्—( ,, ,, )—पितॄणम्... ऋ+ऋ–ॠ

‡ मित्रं सुमार्गेण गन्तृ ऋच्छति सुखम्—गन्तॄच्छति ऋ+ऋ–ॠ

१ **नियमः**—अ–आ, इ–ई, उ–ऊ, ऋ–ॠ हे सजातीय स्वर एकमेकांपुढें आले असतां त्या दोहोंबद्दल दीर्घ स्वर येतो.

---

## प्रश्न

१ कंसांत दिलेल्या शब्दांची योग्य तीं रूपें योजा:—

१ भक्ताः देवं ( माला ) पूजयन्ति ।
२ नरः ( नासिका ) गन्धं जिघ्रति ।
३ ( निशा ) तारकाः द्योतन्ते ।
४ वयं ( रजनी ) ( निद्रा ) सुखं लभामहे ।
५ मालाकारः ( लता ) जलं सिञ्चति ।
६ अध्यापकः ( पाठशाला ) कुमारान् ( कुमारी ) च शिक्षयति ।
७ ( विद्या ) अज्ञानस्य नाशः जायते ।
८ त्वं सागरं ( नौका ) तरसि ।
९ यूयं ( चंद्रमुखी ) उद्याने रमध्वे ।
१० ( जिह्वा ) नरः रसं जानाति ।

---

* प्रथम पदाच्या अन्त्य 'अ' मध्यें ज्या वेळीं पुढील पदाचा आद्य 'आ' मिळतो त्या वेळीं पुढील 'आ' बद्दल दोन अवग्रहचिन्हें लिहिण्याचा प्रघात आहे. जसें माधवाऽऽनन्दं... त्याचप्रमाणें पुढील शब्दाचा आद्य स्वर 'अ' असेल तर त्या 'अ' बद्दल एक अवग्रह कांहीं ठिकाणीं लिहिलेला आढळतो.

† न्यायाधीश खरोखर अपराधाचा तर्क करितो.

‡ चांगल्या मार्गानें जाणारा मित्र सुखाप्रत जातो ( सुख मिळवितो ).

२ पुढील रूपें कोणती आहेत हें सांगून त्यांचा वाक्यात उपयोग करा —
वाप्या, गोदावर्या, रत्नानाम्, शर्वर्याम्, सेवया, कथाभि, विद्याया, आज्ञया, कृपया, तृष्णाया

| | |
|---|---|
| १ ——— तीरे देवालया सन्ति। | ६ ——— अतिशय दु खाय कल्पते। |
| २ अलङ्कारै ——— शरीराणि शोभन्ते। | ७ पान्था ——— काल नयन्ति। |
| ३ भृत्यस्य ——— धनिक तुष्यति। | ८ ईश्वरस्य ——— सङ्कटानि नश्यन्ति। |
| ४ नरा ——— जल लभन्ते। | ९ ——— देवता सरस्वती। |
| ५ ——— निशाचरा चरन्ति। | १० नृपस्य ——— सेना रणाङ्गण गच्छति। |

३ सन्धि करा —

नृपस्य आज्ञा । पश्यति ईश्वर । शोभते खलु उद्यानम् । कमलानि ईक्षते । लभते पूजया आनन्दम् ।

---

# पाठ ७—उपसर्ग.

१ नर गृह **गच्छति** ( जातो )।
बाला शालागृहात् गृहम् **आगच्छन्ति** ( येतात )।
छात्र अध्ययनेन ज्ञानम् **अधिगच्छति** ( मिळवितो )।
बाल जनकम् **अनुगच्छति** ( मागून जातो )।
मालाकार उद्यानात् **निर्गच्छति** ( बाहेर जातो )।
शिष्य आचार्यम् **उपगच्छति** ( जवळ जातो )।
राजपुरुषा नृप **प्रत्युद्गच्छन्ति** ( सामोरे जातात )।
यमुना गङ्गया **सङ्गच्छते** ( मिळते )।

वरील वाक्यात गम् ( गच्छ् ) या प्रथमगणाच्या परस्मैपदी धातूचा उपयोग केलेला आहे, परंतु त्याच्यापूर्वी वर्ण अथवा वर्णसमूह जोडलेले आहेत त्यांना **उपसर्ग** म्हणतात

उपसर्गामुळे 'गम्' धातूच्या अर्थात फरक झालेला दिसून येतो

उपसर्गामुळें धातूचा अर्थ बदलतो अथवा ज्यास्त परिणामकारक होतो. कधीं कधीं अर्थात बदलहि होत नाही शेवटच्या वाक्यामध्यें केवळ अर्थच बदलला नसून पदहि बदलले आहे

उपसर्गेण धात्वर्थो बलादन्यत्र नीयते ।
प्रहाराहारसंहारविहारपरिहारवत् ॥

वरील कवितेचा अर्थ —धातूचा अर्थ उपसर्गामुळे जोरानें दुसरीकडे नेला जातो ( बदलला जातो ) जसें——हृ—हरति-नेणें, **प्रहृ**—प्रहार करणें, **आहृ**—आणणें, खाणें, **संहृ**—संहार किंवा नाश करणें, **विहृ**—विहार करणें, खेळणें, **परिहृ**—टाळणें

२ कांहीं मुख्य उपसर्ग व त्यांचे अर्थ दिले आहेत उपसर्ग धातूच्या पूर्वी जोडताना योग्य तो संधि केला पाहिजे

**अति**—पलीकडे-अतिगच्छति ( पलीकडे जातो )
**अधि**—वर, वरती-अधिरोहति ( वर चढतो )
**अनु**—पाठीमागून-अनुगच्छति ( पाठीमागून जातो )
**अप**—दूर-अपहरति ( दूर नेतो )
**अभि**—कडे-अभिधावति ( हल्ला करतो )
**अव**—खाली-अवतरति ( उतरतो )
**उद्**—वर-उद्गच्छति ( वर जातो )
**उप**—जवळ-उपगच्छति ( जवळ जातो )
**नि**—खाली-निमज्जति ( बुडतो )
**निस्-र्**—बाहेर-निर्गच्छति ( बाहेर जातो )
निःसरति ( बाहेर पडतो )
**परा**—माग-परावर्तते ( मागे वळतो )
**परि**—सभोंवती-परिभ्रमति ( वाटोळा फिरतो )
**प्र**—पुढे-प्रगच्छति ( पुढे जातो )

प्रति—विरुद्ध—प्रतियच्छति ( फेड करतो )
वि— —विस्मरति ( विसरतो )
सम्—एकत्र—सङ्गच्छते ( मिळतो, भेटतो )

टीप —विशेष माहितीसाठी सं० वाक्यरचना पाठ १२ पहा

## काही उपसर्गसहित क्रियापदें

अय् ( परा [ला]-पलायते) पळून जाणें
ईक्ष् ( अप-अपेक्षते)-अपेक्षा करणें
ऋध् ( सम् समृध्यति )-भरभराट होणें
कॄ ( वि-विकिरति ) पसरणें
जि ( परा-वि-पराजयते, विजयते)-पराजय करणें, जिंकणें
तॄ (वि-वितरति)-देणें, स्वाधीन करणें
दिश् (आ आदिशति) हुकुम करणें
नम् (अव-अवनमति)-वाकणें
पद् (उद्-उत्पद्यते)-उत्पन्न होणें
प्रच्छ् (आ-आपृच्छते) निरोप घेणें
भाष् (प्रति-प्रतिभाषते)-उत्तर देणें
भू (अनु-अनुभवति)-अनुभव घेणें
मन् (अनु-अनुमन्यते)-संमति देणें
मस्ज् (नि-निमज्जति)-बुडणें
यम् ( नि-नियच्छति )-ताब्यात ठेवणें
रम् (वि-विरमति)-थांबणें
रुह् (आ-आरोहति)-चढणें
विश् (उप-उपविशति) बसणें
वृत् (नि-निवर्तते)-परत फिरणें
स्था (प्र-प्रतिष्ठते)-निघणें
स्था (उद्-उत्तिष्ठति) उभें राहणें
शंस् (प्र-प्रशंसति)-स्तुति करणें

टीप —वर उपसर्गांसह धातूंची यादी संदर्भासाठी व्याकरणपाठाचे दोन्ही दिली आहे. सम्+गम्, वि-परा+जि, प्र+स्था, आ+प्रच्छ हे धातु उपसर्गामुळें आत्मनेपदी झाले आहेत. वि+रम् हा परस्मैपदी झाला आहे.

## नवीन शब्द

(अ) आरम्भ, आज्ञा, उपदेश, उपभोग, न्याय, औषधम्, किरण, दुःखम्, नाटकम्, प्रयत्न, भस्म, राजधानी, मगर, गरुड, सुखम्, सूत्रधार, सभा

| | | |
|---|---|---|
| (आ) उद् + धृ ( १ प. प. )— उचलणें | कलङ्कः—डाग | पान्थः—पथिकः —वाटसरू |
| ऊर्ध्वम् (अ.)—वर | क्रोधः—राग | विवादः—भांडण |
| ऋणम्—कर्ज | गजः—हत्ती | हर्षः—आनंद |
| पच् ( १ आ. प.)—वाढणें | दरिद्रः—गरीब मनुष्य | |
| ऐरावतः—इन्द्राचा हत्ती | निर्+दा(निर्यच्छति) —फेडणें | |

## सन्धिनियम

नयनेन ईक्षते नरः—नयनेनेक्षते ........................ अ + ई-ए

पूजया ईश्वरः तुष्यति—पूजयेश्वरः .................... आ + ई-ए

आनन्देन ऊर्ध्वं पश्यति नरः—आनन्देनोर्ध्वं ...... अ + ऊ-ओ

हस्तेन उद्धरति पुस्तकं बालः—हस्तेनोद्धरति ...... अ + उ-ओ

*मार्गेण ऋच्छति पान्थः—मार्गेणर्च्छति ........ अ + ऋ-अर्

*सेनया ऋणं निर्यच्छति दरिद्रः—सेनयर्णं ...... आ+ऋ-अर्

ज्या वेळीं सन्धि केला जात नाही त्या वेळा मागील स्वर दीर्घ असल्यास ह्रस्व करावा

---

## प्रश्न

१ अनु, उप परि उद्, व सम् या उपसर्गांना युक्त अशा तीन तीन क्रियापदांची अर्थासह वर्तमानकाळा तृ० पु० एकवचनी रूपें लिहा —

२ उपसर्गांचा उपयोग काय आहे ? उपसर्गांमुळें धातूमध्यें काय काय फरक होतात हें सोदाहरण सांगा

३ पुढील वाक्यांत दिलेल्या धातूंची योग्य रूपें योजा —

१ सैनिका भयेन रणात् (परा + अय्)।
२ छात्र परीक्षायां पारितोषिकम् (अप + ईप्)।
३ सत्यम् एव (वि + जि)।
४ लाभात् क्रोध (उत् + पद्)।
५ त्वं मित्रं हर्षेण (प्रति + भाष्)।
६ नर संसारे सुख दु ख च (अनु + भू)।
७ सूत्रधार नाटकस्य आरम्भे पुष्पाणि (वि + कॄ)।
८ वृक्षा फलानां भारेण (अव + नम्)।
९ चन्द्रस्य चन्द्र किरणानां समूहे (नि + मज्ज्)।
१० वयम् अश्वान् युद्धाय (आ + रुह्)।

४ पुढील उपसर्गांसहित धातूंच्या रूपांचा वाक्यांत उपयोग करा —

(अ) आपृच्छते । आदिशाथ । समृध्यन्ति । निवर्ते । प्रशंसन्ति ।

(आ) पुढील वाक्यांतील धातूंना योग्य ते उपसर्ग लावून रूपें तयार करा —

१ राजपुरुष चोर दण्डेन (हृ) ———— ।
२ त्वं क्रोधं न (यम्) ———— ।
३ दूत राजधानीं (स्था) ———— ।
४ वयं विवाद (मन्) ———— ।
५ बाला सायङ्काले ग्रामगृहान् (इन्) ——

वाक्यारंभीं येत नाहींत ), **अपि**—सुद्धा ( ज्या शब्दाशीं संबंध असेल त्या शब्दानंतर योजतात )

( ३ ) **चिरम्**—पुष्कळ वेळपर्यंत, **नित्यम्**—नेहमी, **नियतम्**—बरोबर, **द्रुतम्-शीघ्रम्**—जलदीनें, **मन्दम्**—हळू, **शाश्वतम्**—चिरकाल पर्यंत ही क्रियाविशेषणें मूळ विशेषणाचें द्वितीयेचें एकवचनी रूप घेऊन तयार केलेलीं आहेत

( ४ ) **सविनयम्**—विनयानें, **सहर्षम्**-सानन्दम्—आनंदानें, **सत्वरम्**—जलदीनें ही अव्ययें मूळचे समास असून त्यांचा द्वितीया-एकवचनी रूपें क्रियाविशेषण अव्ययाप्रमाणें योजलेलीं आहेत.

( ५ ) **अर्जुनः इव शूरः, मुखं चन्द्रः इव,**—**इव**-प्रमाणें हे तुलनात्मक अव्यय ज्याच्याशीं तुलना करावयाची त्या शब्दानंतर योजतात, व ज्याच्याशीं तुलना व ज्याची तुलना करावयाची ते दोन्ही शब्द समान विभक्तींत योजतात

( ६ ) **दशरथस्य नाम नृपस्य रामः नाम पुत्रः**—**नाम**-नांवाचा हें अव्यय नामवाचक शब्द व ज्याचें नाव तो शब्द अशा दोन्ही शब्दांमध्ये योजतात आणि मागील व पुढील अशा दोन्ही शब्दांची एकच विभक्ति असते

**टीप** —वरील अव्ययांचा उपयोग शिकवितांना शिक्षकांनीं तीं वाक्यांत योजून शिकवावीं त्याचप्रमाणें आ, इ, ई, उ या विभागांतील अव्ययेंहि वारंवार उपयोग करून शिकवावीं उदाहरणादाखल प्रत्येक विभागांत थोडथोडीं उदाहरणें दिलेलीं आहेत

(आ) **कुत्र त्वं वससि। कदा अहं जननीं पश्यामि।** या वाक्यांत 'कुत्र—म्हणजे कोठें' आणि 'कदा—केव्हां' हीं प्रश्नार्थक क्रियाविशेषणें योजलेलीं आहेत. तीं आरंभीं अथवा वाक्यांत कोठेंहि योजतां येतात. इतर प्रश्नार्थक अव्ययें —**कथम्**—कसा रीतीनें, **किम्-किमर्थम्**—कशाकरितां, का.

**टीप**—साध्या प्रश्नाच्या आरंभीं 'अपि' योजतात किंवा 'किम्' हें वाक्यांत कोठेंहि योजतात. जसें— अपि त्वं गच्छसि। किंवा, त्वं गच्छसि किम्।

(५) **अहो मधुरं दर्शनं बालकृष्णस्य । अहह सङ्कटे पतितं मित्रम् ।** या वाक्यांतील **अहो** हें आनंददर्शक उद्गारबोधक अव्यय आहे, व **अहह** हें शोकदर्शक उद्गारबोधक अव्यय आहे. हीं वाक्याच्या आरंभीं येतात.

**अहो, अरे, रे, भोः, हे,** हीं संबोधनार्थी अव्ययें आहेत. **अयि** हें संबोधनार्थी अव्यय ज्यास्त प्रेमळपणा दाखवितें. जसें—अयि वत्स ।

**अहह, अहो, बत** आणि **हन्त** हीं उद्गारबोधक अव्ययें वाक्याच्या अर्थानुसार आनंद, शोक किंवा आश्चर्य दर्शवितात.

(६) १ रामः च हरिः च क्रीडतः । रामः हरिः च क्रीडतः ।

च–आणि

२ रामः वा हरिः वा गच्छति । रामः हरिः वा गच्छति ।

वा–अथवा

३ बालः चतुरः अस्ति किन्तु उद्यमं न करोति । किन्तु–परंतु
बालः चतुरः अस्ति उद्यमं तु न करोति । तु–परंतु

४ अहं गृहं गच्छामि यतः मित्रं माम् आह्वयति । यतः–कारण
अहं गृहं गच्छामि मित्रं हि माम् आह्वयति । हि–कारण
मित्रं माम् आह्वयति अतः अहं गृहं गच्छामि । अतः–म्हणून

५ अहं पाठशालां गच्छामि इति बालः जननीं कथयति ।

इति–असें

वरील वाक्यांतून उभयान्वयी अव्ययें योजलेलीं आहेत.

१, २ ' च, वा ' हीं अव्ययें प्रत्येक जोडलेल्या शब्दानंतर अथवा वाक्यानंतर योजून शिवाय शेवटींहि योजतात, किंवा फक्त एकदां शेवटीं योजतात.

३ ' किन्तु, परम् ' हीं उभयान्वयी अव्ययें विरोधदर्शक वाक्याच्या आरंभीं योजतात व ' तु ' हें विरोधदर्शक वाक्यांत पहिल्या शब्दानंतर योजतात.

४ ' यतः ' हें अव्यय कारणदर्शक वाक्याच्या आरंभीं योजतात व ' हि '

हे पहिल्या शब्दानंतर योजतात. '**अतः**' हे कारणदर्शक वाक्यानंतर कार्यदर्शक वाक्याच्या आरंभी योजतात

५ '**इति**' हे प्रत्यक्ष बोललेल्या किंवा विचारात आणलेल्या शब्दानंतर अथवा वाक्यानंतर योजतात

काहीं अधिक उभयान्वयी अव्ययें —

> **यदा-तदा** ( जेव्हा-तेव्हा ), **यदि-तर्हि** ( जर-तर ), **यद्यपि-तथापि** ( जरी-तरीसुद्धा ), **यथा-तथा** ( जसें-तसें ), **यावत्-तावत्** ( जोपर्यंत-तोंपर्यंत ) हीं एकमेकावर अवलंबून असणाऱ्या वाक्याच्या आरंभी योजतात. अवलंबून असणाऱ्या वाक्याच्या ( गौण ) आरंभीं **यदा, यदि, यद्यपि, यथा, यावत्** हीं योजतात आणि ज्याच्यावर अवलंबून असतात त्या वाक्याच्या ( मुख्य ) आरंभीं **तदा, तर्हि, तथापि, तथा, तावत्** हीं योजतात.

( उ ) **वृक्षस्य समीपे** ( जवळ ) **तिष्ठति गोपालः ।**
**नद्याः उपरि** ( वर ) **नौकाः तरन्ति ।**
**वृक्षं परितः** ( सभोंवतीं ) **लताः रोहन्ति ।**

वरील वाक्यात **समीपे, उपरि, परितः** हीं नामाच्या विशिष्ट विभक्तीवरोबर येणारीं **अव्ययें** ( शब्दयोगी ) योजलेली आहेत.

काहीं महत्त्वाचीं शब्दयोगी अव्ययें —

> **धिक्** ( धिक्कार असो ), **सर्वतः** ( सर्व बाजूंनीं ), **उभयतः** ( दोन्ही बाजूंनीं ), **अभितः-परितः** ( सभोंवती ), **प्रति** ( कडे ), **उद्दिश्य** ( उद्देशून ), हीं अव्ययें द्वितीयान्त नामावरोबर योजतात.
>
> **सह-सार्धम्** ( बरोबर ), **अलम्** ( पुरे ), हीं तृतीयान्त नामावरोबर योजतात.
>
> **नमः** ( नमस्कार असो ), **स्वस्ति** ( शुभ अथवा कुशल असो ), हीं चतुर्थ्यन्त नामावरोबर योजतात.
>
> **आरभ्य-प्रभृति** ( पासून ), **ऊर्ध्वम्-अनन्तरम्** ( नंतर ), **बहिस्** ( बाहेर ), हीं पंचम्यन्त नामावरोबर योजतात.

**उपरि** (वर), **अधः** (खाली), **कृते** (करिता), **समीपं-पे** (जवळ), **पश्चात्** (नंतर), **दूरम्** (दूर), हीं षष्ठ्यन्त नामाबरोबर योजतात.

**विना** (शिवाय) हें द्वितीयान्त, तृतीयान्त किंवा पंचम्यन्त नामा-बरोबर योजतात.

## नवीन शब्द

(अ) भूकम्प, विमानम्।

(आ) **अङ्कुरः**—कोंब, **असत्यम्**—खोटें, **खलः**—दुष्ट मनुष्य, **बीजम्**—बी।

---

## प्रश्न

१ पुढील वाक्यांत रिकाम्या जागी योग्य तीं अव्ययें योजा —

१ गजः ——— चलति ——— अश्व ——— चलति। २ वृक्षाणाम् ——— फलानि पतन्ति। ३ कुमार ——— तिष्ठति अध्ययनं करोति ———। ४ ——— भूकम्पेन मनुष्या म्रियन्ते। ५ ——— विमानानि देशात् देशं संचरन्ति। ६ ——— बीजं ——— अङ्कुर। ७ ——— त्वां वद त्वम् असत्यं भाषसे। ८ जनकेन ——— पुत्रा गच्छन्ति। ९ ——— भारतवर्षे पण्डिता काव्यानि रचयन्ति। १० ——— सज्जना खलेषु—उपकारं कुर्वन्ति।

२ पुढील शब्दयोगी अव्ययें योग्य त्या विभक्त्यन्त नामाबरोबर योजा — उपरि, नमः, अलम्, अन्तरेण, बहिस्.

३ पुढील अव्ययांच्या विरोधक अव्ययें योजून वाक्यें तयार करा — दिवा, समीपम्, उच्चैः, सत्वरम्, अत्र, इदानीम्.

# पाठ ९–सर्वनामें.

१ (अ) रामः वदति—अहं पाठशालां गच्छामि। अस्मान् (आम्हांला) अध्यापकः न ताडयति। अस्मासु* (आमच्यावर) आचार्याः स्निह्यन्ति। अस्माकं (आमचें) हितम् एव ते उपदिशन्ति।

(आ) अध्यापकः शिष्यान् वदति—यूयं मम अतीव प्रियाः। युष्माभिः (तुमच्याकडून) अध्ययनं सम्यक् कृतम्। अतः अहं युष्मभ्यं (तुम्हांला) पारितोषिकाणि प्रयच्छामि।

वरील 'अ' मध्यें 'अस्मद्' या प्रथमपुरुषी सर्वनामाची रूपें योजलेली आहेत व 'आ' मध्यें 'युष्मद्' या द्वितीयपुरुषी सर्वनामाचीं योजलेलीं आहेत. यांचीं सर्व लिंगांचीं रूपें एकाच तऱ्हेचीं होतात, कारण बोलणारा पुरुष असो वा बोलणारी स्त्री असो, तो अथवा ती कोणाशींहि बोलतांना स्वतःबद्दल 'मी' व दुसऱ्याबद्दल 'तूं' असाच प्रयोग करणार.

| अस्मद् | | | | युष्मद् | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अहम् | आवाम् | वयम् | प्र. | त्वम् | युवाम् | यूयम् |
| मां–मा | „–नौ | अस्मान्–नः | द्वि. | त्वां–त्वा | युवाम्–वाम् | युष्मान्–वः |
| मया | आवाभ्याम् | अस्माभिः | तृ. | त्वया | युवाभ्याम् | युष्माभिः |
| मह्यं–मे | „–नौ | अस्मभ्यं–नः | च. | तुभ्यं–ते | „–वाम् | युष्मभ्यं–वः |
| मत् | आवाभ्याम् | अस्मत् | पं. | त्वत् | युवाभ्याम् | युष्मत् |
| मम–मे | आवयोः–नौ | अस्माकं–नः | ष. | तव–ते | युवयोः–वाम् | युष्माकं–वः |
| मयि | आवयोः | अस्मासु | स. | त्वयि | युवयोः | युष्मासु |

टीप—सर्वनामांचीं संबोधनाचीं रूपें होत नाहींत.

अस्मद् व युष्मद् यांचीं द्वि., च., ष. या विभक्तींचीं वैकल्पिक रूपें वाक्याच्या प्रारंभीं, कवितेच्या चरणाच्या प्रारंभीं, संबोधनाच्या रूपानंतर आणि च, वा, एव, ह या अव्ययांशीं संबंध असतांना उपयोगांत येत नाहींत. सं॰ वाक्यरचना पाठ १५ नियम २ पहा.

---

* स्निह् (४ प० प०)–प्रेम करणें—या धातूचा प्रयोग ज्याच्यावर प्रेम करावयाचें त्याची सप्तमी विभक्ति योजून करतात.

वयं त्वं रामः च गच्छामः । यूयं ते बालाः च गच्छथ ।
त्वं रामः वयं वा क्रीडामः । वयं त्वं वा क्रीडसि ।
यूयं बालाः वा क्रीडन्ति ।

भिन्नपुरुषी कर्तृपदें 'च' नें जोडलेलीं असल्यास, कर्तृपदामध्यें प्रथमपुरुषी कर्तृपद असल्यास क्रियापदाचा प्रथम पुरुष, प्रथमपुरुषी कर्तृपदाचे अभावीं क्रियापदाचा द्वितीय पुरुष व इतर वेळीं तृतीय पुरुष असतो व वचन सर्व कर्तृपदांचें मिळून अर्थानुरूप असतें

भिन्नपुरुषी कर्तृपदें 'वा' नें जोडलेलीं असल्यास क्रियापदाचा पुरुष व वचन जवळील कर्तृपदाप्रमाणें असतात

२ तद्

गोपालः उपवनं गच्छति । तत्र तस्य (त्याचे) वयस्याः अपि वर्तन्ते । तान् (त्यांना) मालाकारः पश्यति । किन्तु सः तस्मै एव (त्यालाच) पुष्पाणि यच्छति । तेषां (त्यांचा) गन्धः मधुरः । अतः सः (मालाकार) तस्मात् (त्याच्यापासून) धनं लभते । तस्मिन् स्थले (त्या जागीं) वापी वर्तते । तस्याः (तिचें) निर्मलं जलं सः पिबति । तस्याम् (तींत) मत्स्याः दर्दुराः च इतस्ततः प्लवन्ते ।

वरील वाक्यसमूहांत 'तद्' या सर्वनामाचा दोन्ही अर्थांनीं उपयोग केलेला आहे (१) तृतीयपुरुषवाचक सर्वनाम, (२) तो–ती–तें या अर्थी दर्शक सर्वनाम या सर्वनामाचीं रूपें तीन्ही लिंगामध्यें निरनिराळीं होतात, कारण तो वृक्ष–सः वृक्षः, ती वेल–सा लता, तें फूल–तद् पुष्पम्.

| पुंलिंगी | — | तद् | — | स्त्रीलिंगी | | |
|---|---|---|---|---|---|---|
| स | तौ | ते | प्र | सा | ते | ता |
| तम् | ,, | तान् | द्वि | ताम् | ,, | ता |
| तेन | ताभ्याम् | तै | तृ | तया | ताभ्याम् | ताभि |
| तस्मै | ताभ्याम् | तेभ्य | च | तस्यै | ,, | ताभ्य |
| तस्मात् | ,, | ,, | प | तस्याः | ,, | ,, |
| तस्य | तयो | तेषाम् | ष | ,, | तयो | तासाम् |
| तस्मिन् | ,, | तेषु | स. | तस्याम् | ,, | तासु |

**नपुंसकलिंगीः**—प्र. द्वि.—तद् ते तानि. इतर रूपें पुंलिंगाप्रमाणें.

३ **एतद्** :—ज्याप्रमाणें 'तद्' याचा तो–ती–ते या अर्थी दर्शक सर्वनामासारखा उपयोग होतो, त्याप्रमाणें 'एतद्' याचा हा–ही–हें या अर्थी उपयोग केला जातो. त्याचीं रूपें सामान्यतः 'तद्' सारखींच होतात. मात्र पुं. व स्त्री. प्रथमा–एकवचन **एषः** व **एषा** असें होतें. आणि द्वितीया, तृ. एकवचन, षष्ठी–सप्तमी द्विवचन यामध्यें 'त' ऐवजीं 'न' घालूनहि रूपें होतात.

| | द्वितीया | | | तृ. ए. व. | षष्ठी-सप्त. द्विव. |
|---|---|---|---|---|---|
| पु.—एतम्–एनम् | एतौ–एनौ | एतान्–एनान् | | एतेन–एनेन | एतयोः–एनयोः |
| स्त्री.—एताम्–एनाम् | एते–एने | एताः–एनाः | | एतया–एनया | ,, ,, |
| न.—एतद्–एनद् | एते–एने | एतानि–एनानि | | एतेन–एनेन | ,, ,, |

टीपः—हा–ही–हें या अर्थी 'इदम्' हें सर्वनाम एतद् पेक्षां ज्यास्त उपयोगात येतें. त्याचीं रूपें संदर्भाकरिता दिलीं आहेत

टीपः—आपल्या जवळची वस्तु दर्शविण्याकरितां एतद्, त्याच्याहून जरा दूर असणारी वस्तु दर्शविण्याकरिता इदम् व जी वस्तु समोर नाहीं त्याबद्दल तद् योजतात.

४ पुंलिंगी — **इदम्** — स्त्रीलिंगी

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अयम् | इमौ | इमे | प्र. | इयम् | इमे | इमाः |
| इमम्–एनम् | ,,–एनौ | इमान्–एनान् | द्वि | इमाम्–एनाम् | इमे–एने | इमाः–एनाः |
| अनेन–एनेन | आभ्याम् | एभिः | तृ. | अनया–एनया | आभ्याम् | आभिः |
| अस्मै | ,, | एभ्यः | च | अस्यै | ,, | आभ्यः |
| अस्मात् | ,, | ,, | पं. | अस्याः | ,, | ,, |
| अस्य | अनयोः–एनयोः | एषाम् | ष. | ,, | अनयोः–एनयोः | आसाम् |
| अस्मिन् | ,, | एषु | स. | अस्याम् | ,, | आसु |

नपुं.–प्र. इदम् इमे इमानि, द्वि. इदम्–एनद् इमे–एने इमानि–एनानि. इतर रूपें पुंलिंगाप्रमाणें.

५ सर्व—सर्वनामाप्रमाणें चालतें—( सगळे ) ( पुंलिंगी )

सर्वः सर्वौ सर्वे प्र. । सर्वम् सर्वौ सर्वान् द्वि. । सर्वेण सर्वाभ्याम् सर्वैः तृ. ।
सर्वस्मै सर्वाभ्याम् सर्वेभ्यः च. । सर्वस्मात् सर्वाभ्याम् सर्वेभ्यः पं. ।
सर्वस्य सर्वयोः सर्वेषाम् ष. । सर्वस्मिन् सर्वयोः सर्वेषु स. ।

## सर्व—नपुंसकलिंगी

सर्वम् सर्वे सर्वाणि प्र. द्वि., इतर रूपें पुंलिंगाप्रमाणें.

## सर्व—स्त्रीलिंगी

सर्वा सर्वे सर्वाः प्र. । सर्वाम् सर्वे सर्वाः द्वि. । सर्वया सर्वाभ्याम् सर्वाभिः तृ. ।
सर्वस्यै सर्वाभ्याम् सर्वाभ्यः च. । सर्वस्याः सर्वाभ्याम् सर्वाभ्यः पं. ।
सर्वस्याः सर्वयोः सर्वासाम् ष. । सर्वस्याम् सर्वयोः सर्वासु स. ।

६ किम् ( प्रश्नार्थक सर्वनाम )

( १ ) कस्मिन् ( कोणत्या ) क्रीडाङ्गणे त्वं क्रीडसि । ( २ ) काः ( कोणत्या ) भाषाः यूयं पाठशालायां शिक्षध्वे । ( ३ ) तव हस्ते किं ( काय ) वर्तते । ( ४ ) कः ( कोण ) मम कार्यं करोति । ( ५ ) कस्य ( कोणाचें ) इदम् गृहम् ।

वरील वाक्यांत प्रश्नार्थक सर्वनामें योजलेली आहेत. त्यांची रूपें तीन्ही लिंगांचीं निरनिराळीं होतात. ज्या नामाबद्दल प्रश्नार्थक सर्वनाम आलें असेल त्याच्याप्रमाणें 'किम्' याचें लिंग असतें व वाक्याला योग्य ती विभक्ति असते ( वाक्यें ३, ४, ५ ). ज्या वेळेस 'किम्' हें प्रश्नार्थक विशेषण म्हणून उपयोगांत येतें ( वाक्यें १—२ ), त्या वेळीं ज्या नामाशीं त्याचा संबंध असतो त्याच्याप्रमाणें त्याचें लिंग, विभक्ति व वचन हीं असतात.

किम्—पुं.—कः कौ के—प्र., कम् कौ कान्—द्वि., केन काभ्याम् कैः—तृ., कस्मै काभ्याम् केभ्यः—च., कस्मात् काभ्याम् केभ्यः—पं., कस्य कयोः केषाम्—ष., कस्मिन् कयोः केषु—स.; नपुं.—प्र. द्वि. किम् के कानि, इतर पुंलिंगाप्रमाणें.

किम्—स्त्री.—का के काः—प्र., काम् के काः—द्वि., कया काभ्याम् काभिः—

तृ., कस्यै काभ्याम् काभ्यः—च., कस्याः काभ्याम् काभ्यः—पं., कस्याः कयोः कासाम्—ष., कस्याम् कयोः कासु—स.

**टीपः**—वरील 'किम्' या सर्वनामाच्या रूपांना 'चित्, चन, अपि' हे प्रत्यय संधि नियमानुसार जोडले म्हणजे त्याचा अर्थ सामान्य सर्वनामाप्रमाणें होतो.

जसें—कः—कश्चित्-कश्चन-कोऽपि नरः, का—काचित्-काचन-कापि नारी, कस्मिन्—कस्मिंश्चित्-कस्मिंश्चन-कस्मिन्नपि नगरे, कान्—कांश्चित्-कांश्चन-कानपि जनान्, कस्याः—कस्याश्चित्-कस्याश्चन-कस्या अपि पाठशालायाः, कैः—कैश्चित्-कैश्चन-कैरपि बालैः, के—केचित्-केचन-केऽपि जनाः, केषाम्—केषाञ्चित्-केषाञ्चन-केषामपि बालानाम्, केभ्यः—केभ्यश्चित्-केभ्यश्चन-केभ्योऽपि जनेभ्यः।

## सन्धिनियम

| | | |
|---|---|---|
| गच्छति एषः बालः—गच्छत्येषः | ... इ+विजातीय स्वर | = य्+वि.स्व. |
| नदी अवतरति पर्वतात्—नद्यवतरति | ... ई+ ,, | = य्+ ,, ,, |
| त्वं खलु असीव चतुरः—त्वं खल्वसीव | ... उ+ ,, | = व्+ ,, ,, |
| रम्यं वस्तु एतद्—रम्यं वस्त्वेतद् | उ+ ,, | = व्+ ,, ,, |
| रक्षितृ एतद् मित्रम्—रक्षित्रेतद्* | ... ऋ+ ,, | = र्+ ,, ,, |
| पितृ+इच्छा —पित्रिच्छा† (समास) | ऋ+ ,, | = र्+ ,, ,, |

५ **नियमः**—इ-ई, उ-ऊ, ऋ-(ॠ), (ऌ) यांपुढें विजातीय स्वर आल्यास त्याचा अनुक्रमें य्, व्, र्, ल्, असा फरक होतो व त्यांत पुढील स्वर मिळून पूर्णाक्षर होतें.

* रक्षण करणारा हा मित्र आहे. † बापाची इच्छा.

पुष्पे ईक्षते बालः—पुष्पे ईक्षते ... सन्धि होत नाही.
फले आनयति भृत्यः—फले आनयति ... सन्धि होत नाही.
बालौ वन्देते ईश्वरम्—वन्देते ईश्वरम् ... ,,

६ **नियमः**—कोणत्याहि शब्दाच्या द्विवचनी रूपाच्या शेवटी ए हा स्वर आल्यास त्याचा पुढें येणाऱ्या स्वराशीं सन्धि होत नाही.

वने अस्ति वृक्षः—वनेऽस्ति......। ए+अ=एऽ
आकाशे अरुणस्य प्रकाशः रक्तः—आकाशेऽरुणस्य...। ए+अ=एऽ

[illegible] **नियमः**—शब्दाच्या द्विवचनी रूपाशिवाय इतर रूपाच्या शेवटील 'ए' या स्वरापुढें 'अ' हा स्वर आल्यास, 'अ' चा लोप होतो, व त्याचे जागीं ऽ असें चिन्ह (अवग्रह) लिहितात व त्याचा उच्चार करीत नाहीत.

> वने ऋषि वसति—वनयृषिः—वन ऋषिः । अय्+ऋ–अ ऋ
> सुरो औषध क्षिपति नर –सुरयौषध—सुर औषध। अय्+औ–अ औ
> मेघे इन्द्रस्य चाप-शोभते—मेघयिन्द्रस्य—मेघ इन्द्रस्य। अय्+इ – अ इ.

८ **नियमः**—शब्दाच्या द्विवचनान्त रूपाशिवाय इतर रूपांतला 'ए' [illegible] स्वर आल्यास व पुढें 'अ' शिवाय इतर स्वर आल्यास 'ए' चा 'अय्' असा फरक होतो, आणि त्यातील 'य्' पुढील स्वरात मिळून पूर्णाक्षर होतें किंवा 'य्' चा लोप होतो व त्यामुळें एकमेकापुढे येणाऱ्या दोन स्वराचा सन्धि होत नाही.

## नवीन शब्द

| | | |
|---|---|---|
| अभिधानम्–नाव | चापः–धनुष्य | वि+जि (विजयते)–जिंकणें |
| अरुणः–सूर्याचा सारथि | दर्दुरः–बेडूक | |
| असुरः–राक्षस | निर्मल (वि.)–स्वच्छ | विषाणः-णम्–शिंग |
| आवश्यक (वि.)–जरूरीचा | पुस्तकालयः–पुस्तकाचा संग्रह | युगलम्–जोडी |
| इतस्ततः (अ.)–इकडे तिकडे | प्लु (१ आ. प.)–उडी मारणें, तरंगणें | शरणम्–आश्रयाचें ठिकाण |
| | | सुरः–देव |
| उद्गमः–उगम | मर्त्यलोकः–मृत्युलोक | हितम्–फायदा, हितकारक गोष्ट |
| खाद् (१ प प)–खाणें | मत्स्यः–मासा | |
| ग्रामः–गाव | रक्त (वि.)–लाल, तांबडा | हिमालयः–पर्वताचें नाव, (बर्फाचा साठा) |
| देवालयः–देऊळ | वि+कस् (१ प प)–फुलणें, उघडणें | |

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यात योग्य ती सर्वनामाचीं रूपें लिहा —

जनक· (अस्मद्) वचनं शृणोति ।

( युष्मद ) सायङ्काले क्रीडथ ।
( किम् ) ग्रामात् आगत दूत ।
( किम् ) नदीनाम् उद्गम हिमालये वर्तते ।
( किम्+चित् ) ग्रामे ( किम्+चित् ) कवि वसति ।
( तद् ) बालाना प्रश्नान् ( किम् ) कथयति ।
( एतद्–इदम् ) पाठशालाया पुस्तकालय वर्तते ।
हे छात्रा ( युष्मद् ) शिक्षति अध्यापक ।
अयि बाल किम् ( युष्मद् ) अभिधानम् ।

२ अस्मद् व युष्मद् यांना वैकल्पिक रूपें शक्य तर योजा, नाही तर दुसरी योजा —

एतद् पुस्तकम् ( अस्मद् ) एव । ( युष्मद् ) प्रयत्न सफल जात । ( अस्मद् ) च ( युष्मद् ) च सख्यम् आवश्यकम् । अहं रामाय ( युष्मद् ) वा कथा कथयामि । हे ईश्वर ( अस्मद् ) त्वम् शरणम् असि ।

३ प्रश्नार्थक वाक्यें संस्कृतमध्यें कशी तयार करतात व प्रश्नार्थक सर्वनामांवरून सामान्य सर्वनामें कशी तयार करतात हें सोदाहरण दाखवा

४ संधि सोडवून लिहा —

वनमिच्छति निवास मुनि । हिमालयेऽतीव शीतम् । मधुस्रवति । तृणान्यश्व खादति ।

५ संधि करून लिहा —

विकसत कमल उदय सूर्यस्य । मम गजस्य एक आवश्यक । मधु[1] एतद् । भागीरथी अवतरति । पापानि एव । विजयन्ते असुरान् सुरा । शोभयितु[2] एतद् विपाणयुगलम् ।

---

१ मध २ शोभा दावव

# पाठ १०—प्रथमभूतकाल.

१ रामः कृष्णः गोविन्दः गोपालः च देवालयम् अगच्छन् (गेले)। तत्र रामः देवम् अनमत् (नमस्कार केला)। कृष्णः अपि अनमत्। किन्तु गोविन्दः गोपालः च न अनमताम्। सायङ्काले जनकः अपृच्छत् (विचारिलें)। अपि यूयं देवम् अद्य अनमत इति। रामः प्रत्यवदत् (उत्तर दिलें) वयं सर्वे न अनमाम। अहं देवम् अनमम् इति। जनकः पुनर् अपृच्छत्। हे गोविन्द, गोपाल, अपि युवां देवम् अनमतम् इति। गोविन्दः गोपालः च अवदताम् आवां देवम् आलस्येन एव न अनमाव इति। जनकः कृष्णम् अपृच्छत्। अपि त्वं देवम् अनमः इति। कृष्णः प्रत्यवदत्। अथ किम् (होय तर) इति। पश्चात् पुनः ते सर्वे देवम् अनमन्।

वरील उताऱ्यात नम् या प्रथमगणी परस्मैपदी धातूचीं प्रथम भूतकाळीं रूपें योजलेलीं आहेत. पुढील कोष्टकांत तीं क्रमवार लिहिलेलीं आहेत. वन्द् या आत्मनेपदी समानार्थक धातूचींहि दिलीं आहेत.

२ नम् (१ प. प.)—वन्द् (१ आ. प.)

| | | |
|---|---|---|
| अहम् अनमम्–अवन्दे | आवाम् अनमाव–अवन्दावहि | वयम् अनमाम–अवन्दामहि। |
| त्वम् अनमः–अवन्दथाः | युवाम् अनमतम्–अवन्देथाम् | यूयम् अनमत–अवन्दध्वम्। |
| सः अनमत्–अवन्दत | तौ अनमताम्–अवन्देताम् | ते अनमन्–अवन्दन्त। |

पृथक्करणः—अ + नम् + अ + त्। अ + वन्द् + अ + त (तृ. पु. ए. व.)

अ + नम् + अ + अम्। अ + वन्द् + अ + इ (प्र. पु. ए. व.)

अ + नम् + अ + व। अ + वन्द् + अ + वहि (प्र. पु. द्वि. व.)

अ + नम् + अ + अन्। अ + वन्द् + अ + अन्त (तृ. पु. ब. व.)

अशा रीतानें सर्व रूपाचें पृथक्करण केल्यास पुढील प्रत्यय दिसून येतील —

प्रत्यय

| परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|
| अम् | व | म | इ | वहि | महि |
| स् | तम् | त | थास् | इथाम् | ध्वम् |
| त् | ताम् | अन् | त | इताम् | अन्त |

प्रथम भूतकाळाचीं रूपें करताना धातूच्या पूर्वी 'अ' जोडतात त्याला 'आगम' म्हणतात विकरण व प्रत्यय जोडण्यापूर्वींचे नियम वर्तमानकाळाप्रमाणेंच आहेत प्र भूतकाळी रूप—आगम + धातु + विकरण + प्रत्यय.

३ इतर गणाच्या धातूचीं रूपें वरील पद्धतीप्रमाणें तयार करता येतील.

नृत् ( ४ प प. ) अ + नृत् + य + त्–अनृत्यत् ।
जन् ( जा ४ आ. प ) अ + जा + य + त–अजायत ।
सिच् ( सिच् ६ प. प ) अ + सिच् + अ + त्–असिचत् ।
मृ ( म्रिय् ६ आ प ) अ + म्रिय् + अ + त–अम्रियत ।
प्रीं ( प्रीण् १० उ प ) अ + प्रीण् + अय + त्–अप्रीणयत् ।
" " " + त–अप्रीणयत ।

४ बालः पारितोषिकम् ऐच्छत्—मुलानें बक्षिसाची इच्छा केली
पान्थः वनम् आटत्—वाटसरू अरण्यभर फिरला,
नृपः नगरम् आर्च्छत्—राजा नगराप्रत गेला
भिक्षुकः धान्यकणान् औञ्छत्—भिकारी धान्याचे कण निवडता झाला
वरील वाक्यात इष्, अट्, ऋ, उञ्छ् या स्वरारंभी धातूचा प्रथमभूतकाळीं रूपें योजलेली आहेत. त्याचें पृथक्करण पुढीलप्रमाणें होईल —

आ + इच्छ् + अ + त् – ऐच्छत् । आ + अट् + अ + त् – आटत् ।
आ + ऋच्छ् + अ + त् – आर्च्छत् । आ + उञ्छ् + अ + त् – औञ्छत् ।

यावरून असा दिसून येईल कीं स्वरारंभी धातूच्या पूर्वी 'आ' हा आगम जोडतात व त्याचा धातूच्या आद्यस्वराशीं सन्धि वृद्धि प्रमाणें होतो. जसें—
आ + इ – ऐ, आ + अ – आ, आ + ऋ – आर्, आ + उ – औ.

५ रामः रावणम् अभ्यपतत्—रामानें रावणावर चाल केली.

बालाः जनकम् अन्वसरन्—मुलें बापामागून गेले.

सैनिकाः उदतिष्ठन् युद्धारम्भे—युद्धाच्या आरंभीं शिपाई उठले.

वरील वाक्यांत अभि + पत्, अनु + सृ, उद् + स्था या उपसर्गसहित धातूंचीं भूतकाळीं रूपें योजलेलीं आहेत.

पृथक्करण.—अभि + अ – पत् – अ – त् – अभ्यपतत् ।

अनु + अ – सर् – अ – अन् – अन्वसरन् ।

उद् + अ – तिष्ठ् – अ – अन् – उदतिष्ठन् ।

यावरून असें दिसून येईल कीं उपसर्गसहित धातूंचीं प्रथमभूतकाळीं रूपें करतांना प्रथम मूळ धातूचें रूप तयार करून घ्यावें व नंतर त्याला मागें उपसर्ग जोडून सन्धि करावा.

६ कांहीं विशिष्ट धातूंचीं भूतकाळीं रूपें.

अस् (२ प.प.)–आसम् आस्व आस्म । आसीः आस्तम् आस्त । आसीत् आस्ताम् आसन् ।

कृ (८ प.प.)–अकरवम् अकुर्व अकुर्म । अकरोः अकुरुतम् अकुरुत । अकरोत् अकुरुताम् अकुर्वन् ।

श्रु (५ प.प.)–अशृणवम् अशृणुव–ष्व अशृणुम–अशृण्म । अशृणोः अशृणुतम् अशृणुत । अशृणोत् अशृणुताम् अशृण्वन् ।

ज्ञा (९ प.प.)–अजानाम् अजानीव अजानीम । अजानाः अजानीतम् अजानीत । अजानात् अजानीताम् अजानन् ।

ग्रह् (९ प.प.)–अगृह्णाम् अगृह्णीव अगृह्णीम । अगृह्णाः अगृह्णीतम् अगृह्णीत । अगृह्णात् अगृह्णीताम् अगृह्णन् ।

## सन्धिनियम

भक्त: देवम् ईस्ते – देवमीस्ते ।

बाल. सस्मितम् ऊर्ध्वं पश्यति – सस्मितमूर्ध्वं... ।

९ नियम —म् या व्यंजनापुढें स्वर आल्यास दोहोंचें मिळून पूर्णाक्षर होतें

पुष्पम् पश्यति बाल —पुष्पं पश्यति—पुष्पम्पश्यति

यत्नम् करोति नर —यत्नं करोति—यत्नङ्करोति

आनन्दम् जन अनुभवति—आनन्दं जन —आनन्दञ्जन

१० नियम —'म्' पुढें कोणतेंहि वर्गव्यंजन आल्यास 'म्' चा अनुस्वार होतो किंवा 'म्' बद्दल पुढील व्यंजनाच्या वर्गाचें अनुनासिक येतें परंतु सामान्यत अनुस्वार करण्याचा पद्धति रूढ आहे

मित्रम् द्रक्षति राम —मित्रं द्रक्षति .

अन्धकारम् सूर्य नाशयति—अन्धकारं सूर्य

चन्द्रस्य बिम्बम् रात्रौ दृश्यते—बिम्बं रात्रौ

मूर्खम् हसन्ति जना —मूर्खं हसन्ति. .

११ नियम—'म्' पुढें श्, ष्, स्, र्, ह् हीं व्यंजनें आल्यास 'म्' चा नेहमी अनुस्वार होतो

मित्रम् लोचनाभ्या पश्यति नर —मित्रं लोचनाभ्या-मित्रँल्लोचनाभ्याम् । सत्वरम् याति पुनयाति नर —स वरं याति-सत्वरय्याति

१२ नियम —'म्' पुढें य्, व्, ल् हीं व्यंजनें आल्यास 'म्' चा अनुस्वार होतो किंवा 'म्' चा अनुनासिकयुक्त य्, व्, ल् होतो जसें—यँ वँ, ल्ँ परंतु सामान्यत अनुस्वार केला जातो

वृक्षान् उदकेन सिंचति भृत्य —वृक्षानुदकेन

कृपान् अपदत्त बाल —कृपानप दत्त

परन्तु अवदन् एते बाला —अवदन्नेते

एतस्मिन् उद्याने क्रीडन्ति हंसा —एतस्मिन्नुद्याने .

१३ नियम —'न्' पूर्वी ह्रस्व स्वर असून पुढें कोणताहि स्वर आला तर 'न्' चें द्वित्व होतें 'न्' पूर्वी दीर्घ स्वर असेल व पुढें स्वर आला असेल तर त्या दोहोंचें पूर्णाक्षर होतें

ग्रामान् चलति भिक्षुक —ग्रामा चलति-ग्रामाश्चलति ।

उपाविशन् छायायां पान्था —उपाविशं छाया —उपाविशंश्छाया ।

बलीवर्दान् ताडयति कृषीवल —बलीवर्दाः ताडयति–बलीवर्दांस्ताडयति...।

छात्रान् टीका दर्शयति शिक्षकः—छात्रांः टीका–छात्रांष्टीका...।

**१४ नियमः**—अन्त्य 'न्' पुढे च्, छ्, ट्, (ठ्), त्, (थ्) यापैकीं व्यंजन आल्यास 'न्' चा अनुस्वार व विसर्ग होतो; आणि नंतर पुढें च्, छ्, असल्यास विसर्गाचा 'श्' होतो, ट्, (ठ्) असल्यास विसर्गाचा 'ष्' होतो आणि त्, (थ्) असल्यास विसर्गाचा 'स्' होतो.

एतस्मिन् लोके तु सं वर्तते—एतस्मिँल्लोके...।

अपदन् लोका: वार्ताम्—अपदँल्लोका:...।

**१५ नियमः**—अन्त्य 'न्' पुढें 'ल्' हें व्यंजन आल्यास 'न्' चा अनुनासिकयुक्त 'ल्' होतो (ल्ँ).

योध. सैनिकान् शरैः क्षिप्यति—सैनिकाञ्शरैः ...।

नृप: देशान् जयति—देशाञ्जयति ..।

**१६ नियमः**—अन्त्य 'न्' पुढें च–वर्गातील ज् श ध् हे तालव्य वर्ण आले तर 'न्' बद्दल च–वर्गाचें अनुनासिक येतें.

## नवीन शब्द

(आ) अभि+पत्–हल्ला करणें
उदकम्–पाणी
उञ्छ् (६ प. प.)–निवडणें
आ+छद् (१० प. प.)–झाकणें, आच्छादन करणें
उद्+सृज्–सोडून देणें

जमदग्निः (पुं.)–ऋषीचें नाव
दिव्य (वि.)–तेजस्वी, स्वर्गीय
धान्यकणः–धान्याचा कण
परुष (वि.)–कटु, कठोर
निःसारय (प्रयोजक)–(निः+सृ) घालवून देणें

पीवर (वि.)–लठ्ठ
रजकः–धोबी
लगुडः–डम्–काठी
लोचनम्–डोळा
शरः–बाण
सस्मितम् (अ.)–स्मित करून
हस् (१ प. प.) हांसणें

## प्रश्न

१ पुढील गोष्टात वर्तमानकाळाच्या रूपाबद्दल प्रथमभूतकाळा रूपें योजा —

एकस्मिन् नगरे शुद्धपट नाम रजक प्रतिवसति। तस्य एक रासभ अस्ति। दरिद्र स तस्मै खाद्य न यच्छति। एकदा स व्याघ्रस्य चर्म* लभते। तदा स चिन्तयति। अहम् एन रासभ व्याघ्रस्य चर्मणा आच्छादयामि क्षेत्रेषु च उत्सृजामि इति। एव स रासभ क्षेत्रेषु रात्रौ उत्सृजति। क्षेत्रपाला त व्याघ्र मन्यन्ते। अत ते त न नि सारयन्ति। अनन क्रमेण स रासभ पीवर भवति। एकदा स अन्यस्य रासभस्य शब्द शृणोति। स अपि उच्चै शब्द करोति। क्षेत्रपाला त शब्द शृण्वन्ति। अत ते त रासभ मन्यन्ते लगुडै च ताडयन्ति।

२ पुढील वाक्यात प्रथमभूतकाळा रूपें घाला —

जमदग्नि चतुर पुत्रान् — परुषै वचनै (निर्+भर्त्स्)।

अर्जुन इन्द्रस्य अर्धासने — (नि+सद्)।

राम सीता स्थाने स्थाने — (अनु+इष्)।

अर्जुन वासुदेवस्य विश्वरूप — दिव्येन नयनेन (दृश्)।

कर्ण कृष्णस्य हेतुम् — (ऊह्)।

३ पुढील रूप ओळखून त्याचा वाक्यात उपयोग करा —समपद्यत अकृन्तन् व्यकिराम अधमन्, परानयामहि।

४ संधि करा —एतस्मिन् उद्याने रोहन्ति वृक्षा । अगच्छन् अकस्मात् कुमारा बहि । अपश्यन् क्रूरा युद्धे राक्षसान्।

५ संधि सोडवून लिहा —मारमवहद्भवो सेवक । वृक्षाँश्चेचनाय्यामेक्षन्त कुमारा ।

---

* चर्म (चर्मन् या नपुं शब्दाचें प्रथमेचें एकवचन)—चर्मणा हें तृतीयेचें एकवचन

# पाठ ११–विशेषणें.

१ (अ) चतुरेभ्यः बालेभ्यः तथा च चतुराभ्यः कन्याभ्यः शिक्षकः प्रभूतानि पारितोषिकाणि यच्छति—हुषार मुलांना व मुलींना शिक्षक पुष्कळ बक्षिसें देतात (देतो).

(आ) रम्येषु उद्यानेषु रम्यायां कौमुद्यां रम्यः पुष्पाणां गन्धः चित्तम् आह्लादयति—रमणीय बागांमध्यें रम्य चन्द्रप्रकाशांत फुलांचा रम्य सुवास मनाला आनंद देतो.

वरील वाक्यांत चतुर, प्रभूत, रम्य अशीं अकारान्त विशेषणें योजलेलीं आहेत. त्यांचीं रूपें, ज्या नामाचीं तीं विशेषणें आहेत त्यांच्या रूपांप्रमाणें लिंग, विभक्ति व वचन यांमध्यें झालीं आहेत.

| विशेषण | नाम | लिंग | विभक्ति | वचन |
|---|---|---|---|---|
| चतुरेभ्यः | बालेभ्यः | पुं. | च. | बहुवचन |
| रम्यः | गन्धः | पुं. | प्र. | एकवचन |
| प्रभूतानि | पारितोषिकाणि | न. | द्वि. | बहुवचन |
| रम्येषु | उद्यानेषु | न. | स. | बहुवचन |
| परंतु चतुराभ्यः | कन्याभ्यः | स्त्री. | च. | बहुवचन (चतुर+आ=चतुरा) |
| रम्यायाम् | कौमुद्याम् | स्त्री. | स. | एकवचन (रम्य+आ=रम्या) |

वरील उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं अकारान्त विशेषणें पुंल्लिंगामध्यें 'देव' प्रमाणें चालतात, नपुंसकलिंगामध्यें 'वन' प्रमाणें चालतात; स्त्रीलिंगामध्यें त्यांना 'आ' हा प्रत्यय जोडून 'माला' प्रमाणें चालवतात.

कांहीं अकारान्त विशेषणें स्त्रीलिंगामध्यें 'आ' बद्दल 'ई' हा प्रत्यय जोडून 'नदी' प्रमाणें चालविलीं जातात.

जसें—गौर–गौरी, कल्याण–कल्याणी, सारङ्ग–सारङ्गी, पावन–पावनी, शाश्वत–शाश्वती.

काही विशेषणास दोन्ही प्रत्यय जोडतात.

जसें — चण्ड — चण्डा–ण्डी, सुन्दर — सुन्दरा–री, पुराण — णा–णी, नील — नीला–ली, विशाल — विशाला–ली, साधारण — साधारणा–णी.

२ एक, द्वि, त्रि, चतुर्, पञ्चन् ( सङ्ख्याविशेषणें )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पु | एक शब्द | द्वौ शब्दौ | त्रय शब्दा | चत्वार शब्दा | पञ्च शब्दा |
| स्त्री. | एका भाषा | द्वे भाषे | तिस्र भाषा | चतस्र भाषा | पञ्च भाषा |
| न | एकम् अक्षरम् | द्वे अक्षरे | त्रीणि अक्षराणि | चत्वारि अक्षराणि | पञ्च अक्षराणि |

वरील उदाहरणात १ ते ५ या सङ्ख्याविशेषणाचा तीन्ही लिंगामध्यें उपयोग केलेला आहे 'एक' हें एकवचनात, 'द्वि' हें द्विवचनात, 'त्रि, चतुर्, पञ्चन्' हा बहुवचनात चालविले जातात.

| पुंलिंगी रूपें | | | | | स्त्रीलिंगी रूपें | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| एक | द्वि | त्रि | चतुर् | | एक | द्वि | त्रि | चतुर् |
| एक | द्वौ | त्रय | चत्वार | प्र | एका | द्वे | तिस्र | चतस्र |
| एकम् | ,, | त्रीन् | चतुर | द्वि | एकाम् | ,, | ,, | ,, |
| एकेन | द्वाभ्याम् | त्रिभि | चतुर्भि | तृ | एकया | द्वाभ्याम् | तिसृभि | चतसृभि |
| एकस्मै | ,, | त्रिभ्य | चतुर्भ्य | च. | एकस्यै | ,, | तिसृभ्य | चतसृभ्य |
| एकस्मात् | ,, | ,, | ,, | प. | एकस्या | ,, | ,, | ,, |
| एकस्य | द्वयो | त्रयाणाम् | चतुर्णाम् | ष | एकस्या | द्वयो | तिसृणाम् | चतसृणाम् |
| एकस्मिन् | ,, | त्रिषु | चतुर्षु | स. | एकस्याम् | ,, | तिसृषु | चतसृषु |
| एक | द्वौ | त्रय | चत्वार | स | एके | द्वे | तिस्र | चतस्र |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| नपुंसकलिंगीः—प्र, द्वि | एकम् | द्वे | त्रीणि | चत्वारि |
| स | एक | ,, | ,, | ,, |

इतर विभक्तींची रूपें पुल्लिंगी रूपांप्रमाणें

पञ्चन्ः—( पु स्त्री. न. ) प्र स – पञ्च, द्वि – पञ्च, तृ – पञ्चभि, च. पं – पञ्चभ्य, ष – पञ्चानाम्, स – पञ्चसु.

## सन्धिनियम

मूर्खस्य पुस्तकैः कार्यं न विद्यते—पुस्तकैः कार्यं—सन्धि होत नाही.
वृक्षयोः फलानि मधुराणि—वृक्षयोः फलानि—सन्धि होत नाही
कृषीवलः खनति भूमिम्—कृषीवलः खनति—सन्धि होत नाही
वृक्षाः फलानि धारयन्ति —वृक्षाः फलानि— ,,

१७ नियम.—वरील वाक्यातील विसर्गांपूर्वी निरनिराळे स्वर आहेत व पुढे क्, ख्, प्, फ् ही कठोर व्यंजनें आली आहेत म्हणून विसर्गांचा सन्धि होत नाही

नाविकाः तरन्ति सागरम् — नाविकास्तरन्ति .कास् त
वनमार्गैः चरन्ति चोराः — वनमार्गैश्चरन्ति गैश् च
पथिकः छायाम् आश्रयते — पथिकश्छायाम् .. कश् छा
कविः टीकां करोति — कविष्टीका विष् टी .

१८ नियमः—विसर्गांपूर्वी कोणताहि स्वर असला व पुढे त्, (थ्), च्, छ्, ट्, (ठ्), यांपैकी व्यंजनें आली तर विसर्गांचा अनुक्रमें स्, श् व ष्, असा फरक होतो.

मुनिः शास्त्राणि पठति—मुनिः शास्त्राणि किंवा मुनिश्शास्त्राणि... ।
क्षेत्रपालाः सारमेयान् पालयन्ति—क्षेत्रपालाः सारमेयान् किंवा क्षेत्रपालास्सार. ।
चन्द्रस्य कलाः षोडश सन्ति—कलाः षोडश किंवा कलाष्षोडश . ।

१९ नियमः—विसर्गांपूर्वी कोणताहि स्वर असेल व पुढे श्, ष्, स् ही कठोर व्यंजनें असतील तर विसर्ग तसाच राहातो किंवा विसर्गांचा अनुक्रमें श्, ष्, स् असा बदल होतो.

## नवीन शब्द

(अ) नामें —छाया, दिशा, प्रकाश, शृङ्गम् विशेषणें —कठोर, कोमल, चपल, तीक्ष्ण, पवित्र, मधुर, स्थिर

(आ) नामे —आम्रः– आम्र्याचें झाड
आम्रम्–आंबा (फळ)
कला–कला, चंद्राची कोर
कल्लोलः–लाट
क्षेत्रपालः–शेतकरी
खड्गः–तलवार
चन्द्रिका–चन्द्रप्रकाश
चारः–हेर
छत्रम्–छत्रा
धारा–धार
नासिका–नाक
निवासः–राहणें

मृगः, हरिण.–हरिण
मेघः–ढग
यात्रिकः–यात्रेकरू
रासभः–गाढव
लाङ्गूलम्–शेपूट
वायसः–कावळा
व्याधः–पारधी
शीतम्–थंडी
विशेषणें –गंभीर–खोल
घन–दाट
चण्ड–उष्ण
द्वितीय–दुसरा
चतुर्थ (र्थी –र्थं)–चवथा
तुङ्ग–उंच
दीर्घ–लांब
निशित–तीक्ष्ण
धवल–पांढरा
निखिल-अखिल–सर्व

नील–निळा
पक्व–पिकलेला
परम–मोठा
प्रभूत–पुष्कळ
भीषण–भयंकर
शीत–शीतल, थंड
श्वेत– } पांढरा
शुभ्र– }
श्याम–काळा
सुलभ–सोपा
क्रियापदें –आ + नी– आणणें
नि+सद् (निषीदति) –बसणें
खन् (१ प. प.)– खणणें
शुष् (४ प. प.)– सुकणें

---

## प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील विशेषणांची योग्य तीं रूपें घाला —

१ (शीतल) छायायां पान्थ निषीदति ।
२ (निशित) बाणें व्याध मृग विध्यति ।
३ धनिक (प्रभूत) बालाभ्य भूषणानि यच्छति ।
४ (श्याम) मेघा (प्रभूत) जल वर्षन्त ।
५ (गंभीर) वापीषु जल न शुष्यति ।

६ ( धवल ) चन्द्रिकया ( निखिल ) पृथ्वी शोभते ।

७ नरस्य ( एक ) नासिका ( द्वि ) कर्णौ ( द्वि ) नयने च सन्ति ।

८ अश्वस्य ( चतुर् ) पादाः ( दीर्घ ) लाङ्गूल च वर्तन्ते ।

९ ( चतुर् ) मुखानि ब्रह्मदेवस्य ( चतुर् ) दिशासु सन्ति ।

१० मोक्षस्य ( त्रि ) मार्गाणां भक्तिमार्ग ( सुलभ ) ।

२ पुढील नामविभाग व विशेषणविभाग यांच्या योग्य जोड्या लावा —

| नामविभाग | | विशेषणविभाग | |
|---|---|---|---|
| १ वायसस्य स्वर | ६ नदीनां जलम् | १ पक्वानि | ६ चण्ड |
| २ गजस्य आकार | ७ व्याघ्रस्य स्वभाव | २ भीषणा | ७ मधुरम् |
| ३ खड्गस्य धारा | ८ रासभस्य स्वरौ | ३ दीर्घौ | ८ तीक्ष्णा |
| ४ आम्रस्य फलानि | ९ शङ्करस्य नयनानि | ४ कर्कश | ९ हिंस्र |
| ५ सागरस्य कल्लोला | १० सूर्यस्य प्रकाश | ५ त्रीणि | १० स्थूल |

३ पुढील विशेषणे वाक्यात योजा —

नील, पवित्र, चपल, कोमल, दरिद्र, शुभ्र, चतुर्थ, द्वितीय, परम, घन.

४ सन्धि सोडवून लिहा —अश्वास्तृणानि भक्षयन्ति । वृक्षच्छायया तोषयति जनान् । नृपाश्वौ पश्यन्ति ।

५ सन्धि करून लिहा —पान्थ छायायाम् उपविशति आनन्देन । यात्रिका तीर्थानि अटन्ति । धारयति सेवक छत्र नृपस्य उपरि ।

# पाठ १२—विशेषणें (धातुसाधित, भूतकालदर्शक)

१ बालौ ग्रामं गतौ—दोन मुलगे गावाला गेले

राम: रावणाय क्रुद्धः—राम रावणावर रागावला

समुद्रः वातेन क्षुब्धः—समुद्र वाऱ्यानें खवळला

जननी पुत्रस्य पराक्रमेण मुदिता—आई मुलाच्या पराक्रमानें आनन्दित झाली

चन्द्रः प्रकाशितः—चन्द्र प्रकाशला

वैरम् वृद्धम्—वैर वाढलें

वरील वाक्यांत क्रियापदें योजलेलीं नाहींत परंतु त्यांच्या ऐवजीं गत, क्रुद्ध, क्षुब्ध, मुदित, प्रकाशित आणि वृद्ध अशीं भूतकालदर्शक धातुसाधित विशेषणें योजलेलीं आहेत त्यांचीं रूपें अकारान्त विशेषणाप्रमाणें कर्तृपदाच्या लिंग, विभक्ति, वचन यांना अनुसरून झालीं आहेत, कारण वरील सर्व धातु अकर्मक आहेत

असें —बालौ–पु प्र द्विवचन—गतौ–पु प्र द्विवचन
जननी–स्त्री प्र ए व —मुदिता–स्त्री प्र ए. वचन
वैरम्–न प्र ए व —वृद्धम्–न प्र ए वचन

२ बालेन अध्ययनं कृतम्—मुलानें अभ्यास केला
नृपेण वार्ता श्रुता—राजानें बातमी ऐकिली
मालाकारेण वृक्षाः सिक्ताः—माळ्यानें झाडें शिंपलीं

वरील वाक्यांतहि क्रियापदाऐवजीं भूतकालदर्शक धातुसाधित विशेषणें उपयोगांत आणलेलीं आहेत परंतु तीं सकर्मक धातूंचीं असल्यामुळें त्यांचीं रूपें लिंग, विभक्ति व वचन यामध्यें प्रथमान्त कर्मपदाप्रमाणें झालीं आहेत व मूळ कर्तृपदवाचक शब्द तृतीयेंत योजलेले आहेत

यावरून असें दिसून येईल की भूतकालीन क्रिया वरील तऱ्हेचीं धातुसाधित विशेषणें उपयोगात आणूनहि दर्शविता येईल मात्र अशा रूपाचा वाक्यात उपयोग करताना ती सकर्मक धातूंचीं आहेत कीं अकर्मक धातूंचीं आहेत याचा नीट विचार केला पाहिजे कारण त्यावरच वाक्यांचा रचना वर दर्शविल्याप्रमाणें अवलंबून राहील

३ **कृतं निश्चयं प्राज्ञः न त्यजति**—केलेला निश्चय शहाणा मनुष्य सोडून देत नाही

**लब्धेन विजयेन नृपः तुष्यति**—मिळालेल्या विजयानें राजा संतुष्ट होतो.

वरील वाक्यात भूतकालवाचक धातुसाधित विशेषण ज्या नामाशी त्यांचा संबंध आहे त्याचे बरोबर सामान्य विशेषणाप्रमाणें उपयोगांत आणलेली आहेत

**४ कांहीं अकर्मक धातूंचीं भू० का० वा० धातुसाधित विशेषणें**

परा (इ) + अय्-पलायित । सम् + ऋध्-समृद्ध । गम्-गत । जन्-जात । तुष्-तुष्ट । मृ-मृत । नश्-नष्ट । प्र + बुध्-प्रबुद्ध । भ्रंश्-भ्रष्ट । पत्-पतित । मद्-मत्त । मस्ज्-मग्न । सृ-सृत । रम्-रत । आ + रुह्-आरूढ । उप + विश्-उपविष्ट । श्रम्-श्रान्त । स्था - स्थित । उद् + स्था-उत्थित ।

**कांहीं सकर्मक धातूंचीं भू० का० वा० धातुसाधित विशेषणें.**

दृश्-दृष्ट । हृ-हृत । वि + कृ-विकीर्ण । गै-गात । ग्रह्-गृहीत । चि-चित । क्री-क्रीत । दंश्-दष्ट । वि + तृ-वितीर्ण । त्यज्-त्यक्त । दह्-दग्ध । दा-दत्त । आ + दिश्-आदिष्ट । धृ-धृत । नम्-नत । पा-पीत । प्रच्छ्-पृष्ट । आ + रभ्-आरब्ध । लभ्-लब्ध । रक्ष्-रक्षित । व्यध्-विद्ध । श्रु-श्रुत । स्पृश्-स्पृष्ट । आ + ह्वे-आहूत । कथ्-कथित । क्षल्-क्षालित । ऋ-अर्पय-अर्पित । स्था-स्थापय-स्थापित ।

## सन्धिनियम

रामः गच्छति रामस्-राम उ गच्छति रामो गच्छति

नरः अभ्युदयं वाञ्छति—नर उ अभ्युदय नरो*ऽभ्युदय

२० नियम —विसर्गापूर्वी 'अ' आणि पुढें 'मृदु व्यंजन किंवा अ' असल तर विसर्गाचा 'उ' होतो व तो मागील 'अ' मध्यें मिळून त्याचा 'ओ' होतो

योधः इच्छति विजयम्—योधो इच्छति ..
बालः उदकं पिबति—बालो उदक
वृक्षः पतैः पुष्पैः शोभते—वृक्षो पतैः

२१ नियम —विसर्गापूर्वी 'अ' व पुढें 'अ शिवाय स्वर' असेल तर विसर्गाचा लोप होतो व विसर्गाचा लोप झाल्यामुळें एकमेकापुढें येणाऱ्या स्वराचा सन्धि होत नाहीं

बालाः गच्छन्ति पाठशालाम्—बाला गच्छन्ति
,, रमन्ते कन्दुकेन—बाला रमन्ते
इच्छन्ति ज्ञानम्—बाला इच्छन्ति
उत्तिष्ठन्ति आसनेभ्यः—बाला उत्तिष्ठन्ति

२२ नियम —विसर्गापूर्वी 'आ' आणि पुढें 'मृदु व्यंजन' अथवा 'कोणताहि स्वर' असेल तर विसर्गाचा लोप होतो, व नंतर एकमेकापुढें येणाऱ्या स्वराचा सन्धि होत नाहीं

एष —स अस्ति उद्याने—एषोऽस्ति सोऽस्ति
एष —स इच्छति विजयम्—एष-स इच्छति
एष —स उत्तिष्ठति आसनात्—एष स उत्तिष्ठति
एष —स पश्यति मित्रम्—एष-स पश्यति
एष —स नमति देवम्—एष-स नमति

२३ नियम —एष व स यांच्या विसर्गापुढें 'अ' आल्यास विसर्गाचा 'उ' होतो तो 'उ' मागील 'अ' मध्यें मिळतो व 'ओ' होतो आणि नंतर पुढील अचा अवग्रह (ऽ) होतो

---

* ओ या स्वरानंतर येणाऱ्या 'अ' चा लोप होऊन त्याच जागीं अवग्रह (ऽ) लिहितात

'एषः व सः' यांच्या विसर्गांपुढें 'अ' शिवाय इतर स्वर किंवा कोणतेंहि मृदु किंवा कठोर व्यंजन आलें तर विसर्गाचा लोप होतो.

## नवीन शब्द

(अ) अधिकारः, आनन्दः, उपदेशः, नाशः, निश्चयः, वृत्तान्तः, वैरम्, विजयः, शास्त्रम्, साहाय्यम्, सेना.

(आ) अट् (१ प. प. अटति)-हिंडणें

अनु+रुध् (अनुरुध्यते)-आज्ञा पाळणें

अनु+सृ (अनुसरति)-अनुसरणें

आ+श्रि (१ उ. प.)-आश्रय करणें

अर्थः-संपत्ति, द्रव्य

आगमनम्-येणें

चन्द्रापीडः-राजपुत्राचें नांव

चर्-(१ प. प.)-चालणें, गवत खाणें

पठ् (१ प. प.)-पाठ म्हणणें

प्रज्ञः, प्राज्ञः-शहाणा मनुष्य

भषणम्-भुंकणें

पालय (पा. २ प. प.-प्रयोजक)-पाळणें

भिक्षुकः-भिकारी

महाश्वेता-स्त्रीचें नांव

वनमार्गः-रानांतील वाट

सैनिकः-शिपाई

---

### प्रश्न

१ पुढील भूतकालीं धातुसाधित विशेषणें सामान्य विशेषणाप्रमाणें चालवून दाखवा:—

हृत, मुदित, गमुद, गन्तुर, आरब्ध.

२ कंसांतील धातूंचीं भूतकालवाचक धा० वि० योजा.

१ व्याधेन [illegible] मृगः (व्यध्)। २ सैनिकैः चौराः (ग्रह्)।

३ कृष्णस्य वचनात् पाण्डवाः वीरं (प्र+स्था)। ४ सूत्रधारेण पुष्पाणि (वि+कॄ)।

५ भिक्षुकेण दशरथः (प्रच्छ्)। ६ मातृभिः पुत्र. (आ+ह्वे)।

७ जनकेन कन्याभ्य. भूषणानि ( दा ) । ८ प्रवासेन पथिका ( श्रम् ) ।
९ वानराः वृक्षस्य शाखाम् ( आ + रुह् ) । १० वसिष्ठेन राम ( आ + दिश् ) ।

३ पुढील शब्दांची योग्य ती रूपें योजून वाक्ये तयार कराः—

१ ईश्वर, वसुधा, अवतीर्ण, दुर्जन, नाश.

२ चन्द्रापीड, वृत्तान्त, श्रुत, महाश्वेता.

३ वानर, साहाय्य, राम, राक्षस, सेना, जित.

४ जनक, पुत्र, अपराध, क्षान्त.

५ कुक्कुर, श्वपच, चोर, पलायित.

४ सन्धि सोडवून लिहाः—एषोऽस्मत्र देवालयो गजाननस्य । एकदर्पयो यमुनायास्तीरे उपाविशन् । जना इच्छन्त्येतेऽविशारम् । स बालोऽनुसरत्युपदेश जनकस्य ।

५ सन्धि करून लिहा—एष भिक्षुकः याचते अर्थम् । पुनाः अनुदधाने आदेशम् । छात्रा उत्तिष्ठन्ति आसनेभ्य अध्यापकस्य आगमने ।

---

# पाठ १३—इकारान्त नामें व विशेषणें.

१ कविषु ( कवींमध्ये ) कालिदासः श्रेष्ठः । कवयः ( कवि ) नृपान् वर्णयन्ति काव्येषु । नृपः अरिणा सह ( शत्रूबरोबर ) युध्यते । रवेः ( सूर्याचा ) प्रकाशः मध्याह्ने चण्डः । कपिभ्यः ( वानरांना ) फलानि रोचन्ते । मुनिभ्यः ( मुनींपासून ) ज्ञानं लभन्ते शिष्याः ।

वरील वाक्यांत पुं. ह्रस्व इकारान्त नामें—कवि, अरि, रवि, कपि, मुनि—निरनिराळ्या विभक्तींत योजलेलीं आहेत. त्यांचीं रूपें पुढें दिलेल्या ' कवि ' शब्दाच्या रूपाप्रमाणें होतात.

## इकारान्त- पुंलिङ्गः कविशब्दः ।

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| कविः | कवी | कवयः | प्र. | कवेः | कविभ्याम् | कविभ्यः | पं. |
| कविम् | ,, | कवीन् | द्वि. | ,, | कव्योः | कवीनाम् | ष. |
| कविना | कविभ्याम् | कविभिः | तृ. | कवौ | ,, | कविषु | स. |
| कवये | ,, | कविभ्यः | च. | हे कवे | हे कवी | हे कवयः | सं. |

ह्रस्व इकारान्त नामें चालविताना तृ. ए. व आणि ष. ब. व. यामध्यें 'न्' चा 'ण्' होईल की काय हें पाहिलें पाहिजे.

### इकारान्त पुंलिंगी नामें

(अ) ऋषि, कवि, व्याधि, निधि, मुनि, यति.

(आ) अरिः-शत्रु कपिः-वानर हरिः-विष्णु, इन्द्र,
अलिः-भुंगा कलिः-भांडण, कलियुग सिंह, वानर
असिः-तरवार रविः-सूर्य

२ मन्दा गतिः (गति) गजस्य। मुनिः ईश्वरं प्रीणयति भक्त्या (भक्तीनें)। रात्रिषु (रात्री) सञ्चरन्ति निशाचराः। बुद्धेः (बुद्धीच्या) प्रकर्षेण नरः कीर्तिं (कीर्ति) लभते। भूमेः (जमिनी-वरून) उड्डयन्ते कपोताः। मुक्तये (मोक्षाकरिता) यतन्ते यतयः।

वरील वाक्यांत-गति, भक्ति, रात्रि, बुद्धि, कीर्ति, भूमि, मुक्ति- हीं स्त्रीलिंगी इकारान्त नामें निरनिराळ्या विभक्तींत योजलेलीं आहेत. त्यांचीं रूपें पुढें दिलेल्या 'मति' शब्दाप्रमाणें करावीं मात्र ष. ब. वचनांत 'न्' चा 'ण्' होईल की काय हें पाहिलें पाहिजे.

ह्रस्व इकारान्त स्त्रीलिंगी नामाचे दोन भाग पडतात

(१) मूळ धातूला ' ति ' हा भाववाचक नामाचा प्रत्यय जोडून झालेली ( तिबद्दल सन्धिनियमानुसार टि, ड़ि, धि, नि असा फरक होतो )

(२) मूळ इकारान्त नामें

१—कृतिः, जातिः, दृष्टिः, द्युतिः, नीतिः, प्रकृतिः ( स्वभाव प्रजा, मन्त्री ), प्रतिकृतिः ( प्रतिमा ), प्रीतिः, बुद्धिः, भूति ( भरभराट ), रतिः ( प्रेम, मदनाच्या भार्येचें नाव ), रुचि, वसतिः, वृत्तिः ( वागणूक, आचरण ), श्रुतिः ( वेद ), सृष्टि, स्मृतिः ( ग्रन्थाचें नाव, आठवण )

२—भूमिः ( जमीन ), मूर्तिः, रात्रिः.

३ मेघः वारीणा ( पाण्याचा ) वाहकः । तडागस्य वारिणि ( पाण्यात ) कमलानि रोहन्ति । वारिभिः ( पाण्याने ) सिञ्चन्ति मेघाः पृथ्वीम् ।

वरील वाक्यात ' वारि ' या नपुंसकलिंगी ह्रस्व इकारान्त नामाचा उपयोग केलेला आहे संस्कृतमध्यें ह्रस्व इकारान्त नामें फारशी नाहींतच

**इकारान्तः नपुंसकलिङ्गः वारिशब्दः ।**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वारि | वारिणी | वारीणि | प्र. | वारिणः | वारिभ्याम् | वारिभ्यः | पं. |
| ,, | ,, | ,, | द्वि. | ,, | वारिणोः | वारीणाम् | ष. |
| वारिणा | वारिभ्याम् | वारिभिः | तृ. | वारिणि | ,, | वारिषु | स. |
| वारिणे | ,, | वारिभ्यः | च. | हे वारे रि | हे वारिणी | हे वारीणि | सं. |

४ सुरभ्या ( सुवासिक ) मालया भक्तः ईश्वरं पूजयति ।

शुचिनि-शुचौ ( पवित्र ) या तीर्थे जनाः स्नानं कुर्वन्ति ।

शुचिना ( पवित्र ) आचारेण नरः आदरम् अर्हति ।

भूरये ( पुष्कळ ) अर्थाय सर्वे जनाः स्पृहयन्ति ।

गङ्गायाः जलं नरस्य भूरीणि ( पुष्कळ ) पापानि नाशयति ।

वरील वाक्यात इकारान्त विशेषणें—सुरभि, शुचि, भूरि—ही योजलेली आहेत त्यांची रूपें पुल्लिंगामध्यें ' कवि ' प्रमाणें, स्त्रीलिंगामध्यें ' मति ' प्रमाणें

व नपुंसकलिंगामध्यें 'वारि' प्रमाणें आणि चतुर्थी ए. व. ते सप्तमी ए. व., षष्ठी-द्विवचन आणि सप्तमी-द्विवचन, यामध्यें 'कवि' प्रमाणेंहि होतात.

**शुचि. नपुं.** च. ए. व.—शुचिने-शुचये, पं. व ष. ए. व.—शुचिनः-शुचेः, स. ए. व.—शुचिनि-शुचौ, ष. व स. द्वि.—शुचिनोः-शुच्योः.

## सन्धिनियम

हरिः वसति वैकुण्ठे-हरिर् वसति-हरिर्वसति...
बाणैः अरिं विध्यति योधः-बाणैर् अरिं-बाणैररिं...
रवेः आतपः चण्डः-रवेर् आतपः-रवेरातपः......
* सूर्यचन्द्रयोः दर्शनम् आह्लादकम्-सूर्यचन्द्रयोर् दर्शनम्-सूर्यचन्द्रयोर्दर्शनम् ।

**२४ नियमः**—विसर्गापूर्वी 'अ-आ' शिवाय स्वर व पुढें 'स्वर' अथवा 'मृदु व्यंजन' असेल तर विसर्गाचा 'र्' होतो आणि तो पुढील स्वरात मिळून त्याचें पूर्णाक्षर होतें अथवा पुढील व्यंजनाला जोडला जातो.

नृपतिः रक्षति प्रजाः-नृपतिर् रक्षति-नृपती रक्षति...
बाणैः रामः अयुध्यत-बाणैर् रामः-बाणै रामः...
कुशलवयोः* रामः पिता-कुशलवयोर् रामः-कुशलवयो रामः ...
रविः रात्रौ न प्रकाशते-रविर् रात्रौ-रवी रात्रौ...
प्रातर् रमते कन्दुकेन बालः-प्राता रमते...
पुनर् रथ्यया धावति चोरः-पुना रथ्यया...

**२५ नियमः**—विसर्गाबद्दल आलेल्या अथवा मूळच्या 'र्' या व्यंजनापुढें 'र्' नें प्रारंभ झालेला शब्द आला तर पहिल्या 'र्'चा लोप होतो व मागील स्वर ह्रस्व असेल तर दीर्घ होतो.

भोः इह आगच्छत (या)-भोर् इह-भोरिह...
भोः मम वचनं शृणुत (ऐका)-भोर् मम-भोर्मम...
भोः कष्टं मम जीवितम्-भोः कष्टं...

**२६ नियमः**—'भोस्-अरे-अहो' या संबोधनार्थी अव्ययाच्या विसर्गापुढें

मृदु व्यंजन किंवा स्वर आला तर विसर्गाचा 'र्' होतो, आणि पुढें कठोर व्यंजन आल्यास सन्धि होत नाहीं.

**टीप** —* संस्कृतमध्यें दोन अथवा अधिक समान महत्त्वाचीं नामें एके ठिकाणीं जोडून लिहितात अशा सामासिक शब्दाला द्वन्द्व समास म्हणतात अशा द्वन्द्व समासाचें लिंग शवटच्या पदाच्या लिंगाप्रमाणें असतें व वचन समासातील पदार्थांनी दर्शविलेल्या संख्येवर अवलंबून असतें जसें—सूर्य च चन्द्र च-सूर्यचन्द्रौ। कुश च लव च-कुशलवौ। धर्म भीम अर्जुन च-धर्मभीमार्जुना। कन्दा मूलानि फलानि च-कन्दमूलफलानि।

## नवीन शब्द

**अटवी**-अरण्य
**आतपः**-सूर्याची उष्णता
**उच्छ्वासः**-बाहेर टाकलेला श्वास
**तडाग.-गम्**-तलाव
**अशक्य**-( वि )-करता न येण्या सारखें
**कष्ट** ( वि )-दुःखदायक
**नव-नवीन** ( वि )-नवें
**निशाचरः**-राक्षस
**प्रकर्षः**-अति वाढ
**पण्डितः**-विद्वान् मनुष्य
**प्रभावः**-जोर, पराक्रम
**हेमन्तः**—हिंवाळा
**पीडाकर** ( वि )-त्रास देणारा
**प्रमुख** ( वि )-मुख्य
**प्राकृत** ( वि )-सामान्य
**मन्द** ( वि )-हळू जाणारा
**प्रार्थना**-विनवणी
**भारवाहकः**-ओझें उचलणारा
**मध्याह्नः**-दुपार
**रथ्या**-रस्ता
**वैकुण्ठम्**-विष्णूचें निवासस्थान
**वर्ण्** ( १० उ. प )-वर्णन करणें
**विहीन** ( वि. )-नसलेला
**स्निग्ध** ( वि )-प्रेमळ
**सम्+चर्** ( संचरति )-हिंडणें

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यात कंसात दिलेल्या शब्दांची योग्य रूप योजा —

१ ( व्याधि ) मनुष्यस्य शरीरं पीडयन्ति।
२ ( नृपति ) ( अरि ) सह ( असि ) युध्यन्ते।
३ ( रवि ) उदये कृषीवला क्षेत्राणि गच्छन्ति।

४ ( रात्रि ) तिमिला ( सृष्टि ) अन्धकारे निमज्जति ।

५ हेमन्ते शीताना ( वारि ) स्पर्श पीडाकर भवति ।

६ ( स्मृति ) चलक्षणा ( जाति ) आचार वर्णित ।

७ ( भूमि ) मेघा ( वारि ) सिञ्चन्ति ।

८ ( विपत्ति ) ( धृति ) विहाना नरा नश्यन्ति ।

९ ( यति ) ( वसति ) अटव्यां वतव ।

१० ( कपि ) प्रमुखेन ( मारुति ) अशोकवने सीता दृष्टा ।

२ पुढील रूपें पूर्णपणें ओळखून पुढील वाक्यामध्यें योग्य ठिकाणी योजा —
श्रुता , राशीन्, हरे , रश्मिम्, कीतये, शुचिम्, कवे , सखी, रीति , मूर्तये

१ ——— प्रभातेण वर्णाना सङ्कर भवति । २ कवे ——— किमपि अशक्य न । ३ पण्डिता ——— स्पृहयन्ति । ४ यतय ससारात् ——— इच्छन्ति । ५ प्राकृता जना ——— अनुसरन्ति । ६ भक्त ईश्वरस्य ——— पुष्पाणि अर्पयति । ७ नवीना ——— जनेभ्य रोचते । ८ भक्ताना प्रार्थनया ——— चित्त द्रवति । ९ धान्यस्य ——— आनयन्ति भृत्या । १० स्मृतय ——— अनुसरन्ति ।

३ पुढील नामांच्या रूपाना योग्य अशी दिलेल्या विशेषणाची रूपें योजा —

( सुरभि ) पुष्पे । ( शुचि ) मत्या । ( सुरभि ) उच्छ्वासात् । ( शुचि ) धृतिम् । ( भूरि ) कीर्तये ।

४ सन्धि करून लिहा —

एते छात्रै अध्ययन कृतम् । कवि रजन्याम् आकाशे तारका अपश्यत् । हरि उदतिष्ठत् पुनर् रात्रौ । भो भारवाहक अत्र किं तिष्ठसि ।

५ सन्धि सोडवून लिहा —

शत्रोरेता सेना बाणैर्वाराऽविध्यन् । मित्रयोरुपदेशेन कृष्णोऽप्यविन्दत सुखम् ।

---

# पाठ १४–उकारान्त नामें व विशेषणें.

१ कामः क्रोधः च प्रबलौ रिपू (शत्रू) वर्तेते।
चातकाः जलस्य बिन्दून् (बिन्दू) मेघेभ्यः अपेक्षन्ते।
भानुना (सूर्यानें) प्रकाशितं भूतलं शोभते।
पशुभ्यः (पशूंना) तृणं रोचते।
शत्रोः (शत्रूपासून) रक्षणम् इच्छन्ति पौराः।
इन्दौ (चन्द्रावर) कलङ्कः वर्तते।
विनीतः छात्रः गुरूणां (गुरूंची) आज्ञां न उल्लङ्घयति।
हे साधो (साधुपुरुषा) तव उपदेशम् अहं न विस्मरामि।

वरील वाक्यांत—**रिपु, बिन्दु, भानु, पशु, शत्रु, इन्दु, गुरु, साधु**—हे उकारान्त पुलिंगी शब्द भिन्न भिन्न विभक्तींत योजिलेले आहेत.

उकारान्त. पुंलिङ्ग. भानुशब्द.।

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| भानुः | भानू | भानवः | प्र. | भानोः | भानुभ्याम् | भानुभ्यः | पं. |
| भानुम् | भानू | भानून् | द्वि. | भानोः | भान्वोः | भानूनाम् | ष. |
| भानुना | भानुभ्याम् | भानुभिः | तृ. | भानौ | ,, | भानुषु | स. |
| भानवे | ,, | भानुभ्यः | च. | हे भानो | हे भानू | हे भानवः | सं. |

उकारान्त पुलिंगी नामाचीं ‘भानु’ प्रमाणें रूपें करताना तृ. ए. वचन आणि ष. ब. वचन यांत जरूर तेथें ‘न्’ च्या ‘ण्’ केला पाहिजे

(अ) पशु, बन्धु, बिन्दु, मृत्यु, वायु, विष्णु, शत्रु, साधु

| | | |
|---|---|---|
| (आ) असु.—प्राण* | प्रभुः—मालक, धनी | विधुः—चन्द्र |
| इषु —बाण | राहुः—ग्रहाचें नांव | शम्भुः—शङ्कर |
| परशु.—कुऱ्हाड | रिपुः—शत्रु | शिशुः—लहान मूल |

* असु व प्राण हे शब्द नेहमीं बहुवचनांत योजतात.

२ मित्रस्य प्राणानां रक्षणे साधवः तन्वाः ( देहाचा ) त्यागम् अपि न गणयन्ति। खगाः चञ्च्वा ( चोचीनें ) उदरं पूरयन्ति। अन्धाः कदाचित् रज्जुं ( दोरीला ) सर्पं मन्यन्ते। दिलीपेन धेनोः ( गाईकडून ) वरः लब्धः। शरय्वाः ( शरयूच्या ) तीरे अयोध्या तिष्ठति। शत्रोः चमूनाम् ( सैन्याच्या ) उपरि वीरः बाणान् किरति। रामः वध्वा सह ( पत्नीबरोबर ) अरण्यं गतः। स्नुषा श्वशुरं श्वश्रूं ( सासूला ) च आपृच्छते जनकस्य गृहं न गच्छति।

वरील वाक्यांत ह्रस्व व दीर्घ उ-ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें योजलेली आहेत. त्यापैकी ह्रस्व उकारान्त स्त्रीलिंगी नामें 'धेनु' प्रमाणें चालवावीं व दीर्घ ऊकारान्त 'वधू' प्रमाणें चालवावीं.

उकारान्तः स्त्रीलिङ्गः धेनुशब्दः। ऊकारान्तः स्त्रीलिङ्गः वधूशब्दः।

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धेनुः | धेनू | धेनवः | प्र. | वधूः | वध्वौ | वध्वः |
| धेनुम् | ,, | धेनूः | द्वि. | वधूम् | ,, | वधूः |
| धेन्वा | धेनुभ्याम् | धेनुभिः | तृ. | वध्वा | वधूभ्याम् | वधूभिः |
| धेनवे–न्वै | ,, | धेनुभ्यः | च. | वध्वै | ,, | वधूभ्यः |
| धेनोः–न्वाः | ,, | ,, | पं. | वध्वाः | ,, | ,, |
| ,, | धेन्वोः | धेनूनाम् | ष. | ,, | वध्वोः | वधूनाम् |
| धेनौ–न्वाम् | ,, | धेनुषु | स. | वध्वाम् | ,, | वधूषु |
| हे धेनो | हे धेनू | हे धेनवः | सं. | हे वधु | हे वध्वौ | हे वध्वः |

उकारान्त स्त्रीलिंगी नामें.—चञ्चुः–चोंच, तनुः–देह, धेनुः–गाय, रज्जुः–दोरी.

ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें.—चञ्चूः–चोंच, चमूः–सैन्य, घरणूः–गवपउनय धान्य, वधूः–नवरी, सून, पत्नी, शरयूः–नदीचें नांव, श्वश्रूः–सासू.

३ शोकेन नयनयोः अश्रूणि ( अश्रु ) उद्भवन्ति।
मधुपः एव मधुनः ( मधाचा ) मार्मिकः।

**दुर्लभाय वस्तुने (वस्तूकरता) न स्पृहयति प्राज्ञः ।**
**अल्पेन वसुना (द्रव्यानें) न तुष्यति कदर्यः ।**

वरील वाक्यात ह्रस्व उकारान्त नपुंसकलिंगी नामाचा रूपें योजलेली आहेत

### उकारान्त. नपुंसकलिङ्ग मधुशब्द ।

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मधु | मधुनी | मधूनि | प्र | मधुन | मधुभ्याम् | मधुभ्य | पं. |
| ,, | ,, | ,, | द्वि | ,, | मधुनो | मधूनाम् | ष. |
| मधुना | मधुभ्याम् | मधुभि | तृ | मधुनि | ,, | मधुषु | स |
| मधुने | ,, | मधुभ्य | च. | हे मधो–धु | हे मधुनी | हे मधूनि | सं |

ह्रस्व उकारान्त नामें 'मधु' प्रमाणें चालवावीं व 'न्' चा 'ण' जेथे तेथे करावा

(अ) अश्रु वस्तु

(आ) तालु–तोंडाच्या आतील वरचा भाग, मधु–मध, वसु–धन

४ **उकारान्त विशेषणें**

**गुरु भार. । पटु –पट्वी कन्या । स्वादु फलम् ।**

उकारान्त विशेषणें पुल्लिंगामध्यें 'भानु' प्रमाणें चालवावीं स्त्रीलिंगामध्यें 'धेनु' प्रमाणें अथवा दीर्घ ई जोडून 'नदी'प्रमाणें चालवावीं व नपुंसकलिंगामध्यें 'मधु' प्रमाणें चालवावा, मात्र चतुर्थी ते सप्तमी एकवचन आणि षष्ठी सप्तमीद्विवचन यामध्यें विकल्पानें 'भानु' प्रमाणेंहि रूपें करावीं

जसें स्वादु (न)—स्वादुने–स्वादवे–च ए व स्वादुन –स्वादो –प ष ए, व स्वादुनि स्वादौ–स ए व स्वादुनो –स्वाद्वो –ष स द्विवचन

उकारान्त विशेषणें —गुरु–जड, मोठा, चारु–सुंदर, तनु–लहान, बारीक, पटु–हुषार, बहु–पुष्कळ, मृदु–मऊ लघु थोडा, लहान, स्वादु–गोड

टीप —उकारान्त विशेषणाच्या अन्त्य 'उ' पूर्वी जर संयुक्त व्यञ्जन नसेल तर स्त्रीलिंगामध्यें फक्त धेनुप्रमाणें रूपें करावीं जसें—पाण्डु रात्रि ।

## सन्धिनियम

बाल कमले ईक्षते—बाल कमले ईक्षते ।
कवी आगच्छत नृपस्य सभाम्—कवी आगच्छत ।
क्रोध लोभ च रिपू अतीव पापकौ—रिपू अतीव ।
एते द्वे वस्तुनी अहं इच्छामि—वस्तुनी अहं ।

२७ नियम —वरील वाक्यांतील कमल, कवी, रिपू, वस्तुना या द्विवचनान्त शब्दांच्या शेवटल्या इ, ऊ व ए यांच्यापुढें आलेल्या स्वराशीं त्याचा सन्धि होत नाहीं. या स्वरास 'प्रगृह्य स्वर' असें म्हणतात

१ प्रभो अस्मान् रक्ष—प्रभो अस्मान् किंवा प्रभोऽस्मान् ।
२ इन्द्रो अत्र रम्य तव निधनम्—इन्द्रो अत्र किंवा इन्द्रोऽत्र ।
३ विष्णो इच्छामि मोक्षम्—विष्णो इच्छामि किंवा विष्णविच्छामि—किंवा विष्ण इच्छामि ।
४ भानो—एप चण्ड प्रकाश असह्य —भानो एष किंवा भानवेष किंवा भान एष ।

२८ नियम —वरील वाक्यावरून असें दिसून येईल कीं संबोधनार्थी स्वरान्त पदाचा पुढें येणाऱ्या स्वराशीं विकल्पानें सन्धि केला जातो, आणि ज्या वेळेला सन्धि होतो त्या वेळेस मागील स्वर 'ओ' असून पुढील स्वर 'अ' असल्यास त्याचा लोप करून त्याचे जागीं (ऽ) अवग्रह लिहितात आणि इतर स्वर असल्यास 'ओ' चा 'अव्' असा फरक करून 'व्' पुढील स्वरांत मिळवून त्याचें पूर्णाक्षर करतात अथवा 'व्' चा लोप करतात

वन्दामहे ईश्वर वयम्-वन्दामहा ईश्वर किंवा वन्दामहायीश्वर ।
(नमस्कार करूं या)
तस्मै अहं फलम्-तस्मायहं किंवा तस्मा अहं । (मिळ दे)
तस्मै अलङ्कार यच्छामि-तस्मा अलङ्कार किंवा तस्मायलङ्कार ।

२९ नियम —शब्दाच्या अन्त्य 'ऐ' पुढें कोणताहि स्वर आला तर 'ऐ' चा 'आय्' असा फरक करावा व 'य्' पुढील स्वरांत मिळवून पूर्णाक्षर करावें किंवा 'य्' चा लोप करावा

कलौ एव विचित्र प्रकार जायते—कलावेव–किंवा कला एव ।
गुरौ अतीव स्नेह छात्राणाम्—गुरावतीव किंवा गुरा अतीव ।
रात्रौ इतस्तत सञ्चरन्ति राक्षसा —रात्रावितस्तत किंवा रात्रा इतस्तत ।

**३० नियमः**—शब्दाच्या अन्त्य 'औ' चा पुढील स्वराशीं संधि करतांना 'औ' चा 'आव्' असा फरक होतो व त्यांतील 'व्' पुढील स्वरांत मिळून पूर्णाक्षर करतात किंवा 'व्' चा लोप करतात

टीप—य् किंवा व् यांचा लोप झाल्यामुळें एकमेकांपुढें येणाऱ्या स्वरांचा पुन्हा संधि होत नाहीं

## नवीन शब्द

(अ) स्थान, प्रसिद्ध (वि), वर, शोक, सभा

(आ) अन्ध (वि)—आंधळा

आस्पदम्—जागा

आ+ह्लाद् (१ आ प)—आनंदित होणें. आह्लादयति' (प्रयोजक)—आनंदित करणें.

उद्+लङ्घ् (उल्लङ्घते–उल्लङ्घयति)—ओलांडणें, उल्लंघन करणें

कदर्य.-कृपणः—कंजूष मनुष्य

कलङ्कः—डाग

कीटः-कीटकः—किडा

घटः—मडकें

चातकः—पक्ष्याचें नाव

दिलीपः—रघुवंशांतील राजाचें नांव

निपात—पडणें

निषिद्ध (वि)—निषेध केलेला

पूर् (४ आ प.–पूर्यते १० उ. प–पूरयति–ते)—भरणें

पौरः—शहरवासी मनुष्य

मधुपः—भुंगा

मार्मिकः—मर्म ओळखणारा

विनीत (वि)—विनयशील

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील शब्दांची योग्य रूपें घाला —

१ (वसु) लाभेन नर आदरास्पद भवति ।

२ (साधु) पाठयति (पितृ) (भ्रातृ) च ।

३ (शिशु) आनन जननाम् आह्लादयति ।
४ (साधु) (तनु) परोपकाराय वर्तते ।
५ (वारि) (बिन्दु) निपातन घट पूरयति ।
६ (रघु) (चमू) सह दिग्विजयाय प्रस्थित ।
७ भृत्या (प्रभु) आदेशम् अनुरुध्यन्ते ।
८ (वधू) श्वशुर (श्वश्रू) च नमति ।
९ (चञ्चु) विहगा कीटकान् उद्धरन्ति ।
१० (अश्रु) आकुले नयने बालस्य ।

२ पुढील नामांना अनुरूप अशीं दिलेल्या विशेषणाचीं रूपें योजा —
(पटु) ललना । (गुरु) भारेण । (लघु) नयने । (स्वादु) फलानि ।
(चारु) चित्रे । (मधु) स्वरस्य । (मृदु) व्यञ्जनानाम् । (भीरु) नार्यो ।

३ पुढील रूपें काय आहेत हें सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा —
रिपो, धेन्वा, वस्तूनाम्, इन्दौ, दारुभ्याम् ।

४ सन्धि करा —प्रभो अस्माकं शरणम् असि । कवी एतानि कृत्यानि निर्मितानि । कालिदास भवभूति च द्वौ कवी एतस्मिन् भारतवर्षे अतीव प्रसिद्धौ । द्रुप द्रोण च कौरवाणां गुरू आस्ताम् ।

५ सन्धि सोडवून लिहा —इन्दू राजपुत्रस्य आनने । गुना अतीव विश्वासस्थानानाम् । विद्याविवेक कलहो वर्तते ।

---

## पाठ १५–कर्मणि व भावेप्रयोग.

---

१ (अ) बालः ईश्वरं नमति–वन्दते—मुलगा ईश्वराला नमस्कार करतो
बालेन ईश्वरः नम्यते–वन्द्यते—मुलाकडून ईश्वराला नमस्कार केला जातो.

(आ) त्वं कन्दुकान् क्षिपसि—तू चेण्डू फेंकतोस
त्वया कन्दुकाः क्षिप्यन्ते—तुझ्याकडून चेण्डू फेंकले जातात
(इ) ईश्वर: अस्मान् पश्यति—ईश्वर आम्हाला पाहतो
ईश्वरेण वयं दृश्यामहे—ईश्वराकडून आम्ही पाहिले जातों

वरील तान्हा वाक्यें दोन दोन प्रकारानीं लिहिलेली आहेत त्यातील अर्था मध्यें भेद नाहीं परंतु रचनेच्या पद्धतींत फरक आहे पहिल्या प्रकारात कर्तृपदाला प्रामुख्य दिलेलें आहे व दुसऱ्या प्रकारामध्यें कर्मपदाला प्राधान्य दिलेलें आहे म्हणून पहिला कर्तरि प्रयोग व दुसरा कर्मणि प्रयोग वरील वाक्यातील क्रियापदें सकर्मक आहेत पहिल्या प्रकारात प्रथमान्त कर्तृपदाप्रमाणें क्रियापदाचा पुरुष व वचन झाली आहेत व दुसऱ्या प्रकारात प्रथमान्त कर्मपदाप्रमाणें क्रियापदाचें कर्मणि तऱ्हेचें रूप पुरुष व वचन यामध्यें झालें आहे व कर्तृपद तृतीयेंत योजलेलें आहे

आता क्रियापदाचीं रूपें कर्मणि तऱ्हेचीं कशीं झालीं आहेत हें पाहू —

नम्यते – नम् + य + ते
वन्द्यते – वन्द् + य + ते
क्षिप्यन्ते – क्षिप् + य + अन्ते
दृश्यामहे – दृश् + य + महे

यावरून असें दिसून येईल कीं सामान्यपणें कर्मणि तऱ्हेचें रूप करताना मूळ धातु प्रथम घ्यावा, त्याला य हें चिन्ह जोडावें, व नंतर योग्य तें आत्मनेपदी प्रत्यय जोडावे

२ (अ) बाल आसने उपविशति—बालेन आसने उपविश्यते।
(आ) त्वं भृत्याय कुप्यसि—त्वया भृत्याय कुप्यते।
(इ) वयं विजयेन मोदामहे—अस्माभिः विजयेन मुद्यते।

वरील वाक्याच्या दोन्ही प्रकारामध्येंहि अर्थभेद नाही, परंतु रचनेंत मात्र भेद आहे या वाक्यातील क्रियापदें अकर्मक असल्यामुळें वर दाखविलें या कर्मणि प्रयोगाप्रमाणें रचना झालेली नाही कर्तृपदाची तृतीया विभक्ति झाली आहे व क्रियापद कर्मणि तऱ्हेनें तृतीयपुरुषी एकवचनामध्यें योजलेलें आहे

(४)

| धातु | यज् | वद् | वह् | वस् | (आ) ह्वे | स्वप् (२ग.प.प.) | ग्रह् | प्रच्छ् |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कर्तरि | यजति | वदति | वहति | वसति | ह्वयति | स्वपिति | गृह्णाति | पृच्छति |
| कर्मणि | इज्यते | उद्यते | उह्यते | उष्यते | हूयते | सुप्यते | गृह्यते | पृच्छ्यते |

वरील धातूंचीं कर्मणि तन्हेचीं रूपें होतांना धातूंतील य्, व् आणि र् यांच बद्दल इ, उ व ऋ असा अनुक्रमें फरक झाला आहे. या फरकाला **संप्रसारण** असे म्हणतात. य्, व्, र् यांचा इ, उ, ऋ असा फरक झाल्यावर पूर्वीच्या स्वराचा लोप होतो. जसें—यज्–इ + ज् + य + ते – इज्यते ( य्+अ – इ )

स्वप्–स् + उ + प् + य + ते – सुप्यते ( स् + व् + अ – उ )

(५)

| धातु | शंस् | स्रंस् | ध्वंस् | दंश् | भ्रंश् | बन्ध् (९ ग. प. प.) |
|---|---|---|---|---|---|---|
| कर्तरि | शंसति | स्रंसते | ध्वंसते, | दशति | भ्रंशते | बध्नाति |
| कर्मणि | शस्यते | स्रस्यते | ध्वस्यते | दश्यते | भ्रश्यते | बध्यते |

वरील धातूंतील अनुनासिकाचा 'य' पूर्वी लोप होतो.

(६)

| धातु | तड् | तुल् | धृ (१० ग.) | धू | भू | १० गणाचे धातु |
|---|---|---|---|---|---|---|
| कर्तरि | ताडयति | तोलयति | धारयति | धूनयति | भावयति | |
| कर्मणि | ताड्यते | तोल्यते | धार्यते | धून्यते | भाव्यते | |

| धातु | नश् (प्रयोजक) | तुष् (प्र.) | दृश् (प्र.) | प्रयोजक रूपें |
|---|---|---|---|---|
| कर्तरि | नाशयति | तोषयति | दर्शयति | |
| कर्मणि | नाश्यते | तोष्यते | दर्श्यते | |

वरील उदाहरणावरून असें दिसून येईल की, दशम गणाच्या धातूंमध्यें व प्रयोजक क्रियापदामध्यें 'अय' पूर्वी जे फरक होतात ते 'कर्मणि य पूर्वी' कायम राहातात.

(७)

| धातु | तॄ | खन् | जन् |
|---|---|---|---|
| कर्तरि | तरति | खनति | जायते |
| कर्मणि | तीर्यते | खन्यते–खायते | जन्यते–जायते |

कर्मणि 'य' पूर्वी 'तॄ' धातूंतील 'ॠ' चा 'ईर्' होतो. जन् व खन् यांचीं विकल्पानें य पूर्वी 'जा' व 'खा' अशीं रूपें होतात.

२ पान्थः गोविन्दं मार्गं पृच्छति–पान्थेन गोविन्दः मार्गं पृच्छ्यते ।
भिक्षुकः धनिकं धनं याचते–भिक्षते–भिक्षुकेण धनिकः धनं याच्यते भिक्ष्यते वा ।
जननी बालं देवालयं नयति–जनन्या बालः देवालयं नीयते ।

वरील वाक्यांतील प्रच्छ्, याच् व नी हे द्विकर्मक धातु आहेत. ज्याला विचारावयाचें, ज्याची याचना करावयाची व ज्या स्थलाप्रत न्यावयाचें ते शब्द **गौण कर्मपदें** व जें विचारावयाचें, जें मागावयाचें, व जें न्यावयाचें ते शब्द **मुख्य कर्मपदें**. अशा वाक्याचा कर्मणि प्रयोग करतांना 'प्रच्छ् व याच् यांच्या गौण कर्मपदाची प्रथमा विभक्ति करावी व नी धातूच्या मुख्य कर्मपदाची प्रथमा विभक्ति करावी, आणि इतर कर्मपदें द्वितीयेंतच ठेवावीं.

## प्रथमभूतकाळ ( कर्मणि रूपें )

| | कर्तरि | कर्मणि | पृथक्करण |
|---|---|---|---|
| ४ | कृ — अकरोत् | अक्रियत | अ + कृ ( क्रि ) + य + त |
| | तड् — अताडयत् | अताड्यत | अ + तड् ( ताड् ) + य + त |
| | यज् — अयजत् | ऐज्यत | आ + यज् ( इज् ) + य + त |
| | जि — अजयत् | अजीयत | अ + जि ( जी ) + य + त |
| | दा — अयच्छत् | अदीयत | अ + दा ( दी ) + य + त |
| | वि+स्मि–व्यस्मयत | व्यस्मीयत | वि + अ + स्मि ( स्मी ) + य + त |
| | स्मृ — अस्मरत् | अस्मर्यत | अ + स्मृ ( स्मर् ) + य + त |
| | प्र+शंस्–प्राशंसत् | प्राशस्यत | प्र + अ + शंस् ( शस् ) + य + त |
| | हस् — अहसत् | अहस्यत | अ + हस् + य + त |
| | इष् — ऐच्छत् | ऐष्यत | आ + इष् + य + त |

वरील भूतकाळी कर्मणि तृ॰ पु॰ एकवचनी उदाहरणावरून असें दिसून येईल कीं प्रथमभूतकाळी कर्मणि रूपें करतांना प्रथम अ किंवा आ हा आगम, नंतर मूळ धातु अथवा 'य' पूर्वी होणारें रूप, नंतर य हें कर्मणि चिन्ह व शेवटी प्रथमभूतकाळी आत्मनेपदी प्रत्यय अशा क्रमानें रूपें बनवावीं लागतात.

टीप — ज्यास्त माहितीकरितां संस्कृतवाक्यरचना पाठ १४ पहा.

## सन्धिनियम

वनात् आगच्छति मुनिः—वनादागच्छति...... ।

आगच्छत् एकदा कश्चित् पान्थः—आगच्छदेकदा...... ।

ककुभ् + अन्तः—ककुबन्तः ( समास )। ( दिशेचें टोंक )

समिध् + आहरणम्—समिदाहरणम् ( समास )। ( समिधा आणणें )

३१ नियमः—वरील उदाहरणावरून हें दिसून येईल की शब्दाच्या शेवटीं अनुनासिकावांचून कोणत्याहि वर्गाचें इतर व्यंजन आल्यास व त्याच्यापुढें स्वर आल्यास मागील व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन होतें.

नगरात् बहिः गच्छति दूतः—नगराद्बहि ...... ।

आसनात् गुरु उत्तिष्ठति—आसनाद्गुरु ...... ।

ककुभ् + मार्ग —ककुब्मार्गः । ( समास ) दिशेचा मार्ग.

समिध् + भङ्ग —समिद्भङ्गः । ( समास ) समिधेचा तुकडा.

३२ नियमः—कोणत्याहि वर्गाच्या अनुनासिकाशिवाय इतर व्यंजनापुढें मृदु व्यंजन आल्यास मागील व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन येतें.

नगरात् नगरं भ्रमति भिक्षुकः—नगराद्नगरं किंवा नगरान्नगरं... ।

अपश्यत् मण्डलं सूर्यस्य बालः—अपश्यद् मण्डलं किंवा अपश्यन्मण्डलं .. ।

३३ नियमः—कोणत्याहि वर्गाच्या अनुनासिकाशिवाय इतर व्यंजनापुढें अनुनासिकानें आरंभ झालेला शब्द आल्यास मागील व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन अथवा अनुनासिक येतें.

मृद् + मय ( घट )—मृन्मय घट ( मातीचें बनविलेलें मडकें )

तद् + मय ( भक्तः )—तन्मयः भक्त ( तल्लीन झालेला भक्त )

३४ नियमः—कोणत्याहि वर्गाच्या अनुनासिकाशिवाय इतर व्यंजनापुढें अनुनासिकानें आरंभ झालेला प्रत्यय आला तर मागील व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें अनुनासिक येतें.

## नवीन शब्द

(अ) आरोग्यम् व्यायाम

(आ) तुला तराजू, तागडा

दुर्ग –र्गम् किल्ला, राजातील बळकट ठाणें

ध्रुव विष्णुभक्ताचें नाव

भेद् –फोडणें

मण्डलम्–बिम्ब वतुळ, समुदाय

राज्यतन्त्रम्–राज्याचा कारभार

वर्षा वर्षाकाळ पावसाळा

वि+दृ (१०उ प – विदारयति–त)— फाडणें तुकडे करणें

स्वीकृत (वि) स्वीकार केलेला

सो (अव अवस्यति– च ग प प)— संपणें अंत होणें

---

### प्रश्न

१ कर्तरि कर्मणि व भावे अशी प्रयोगाचीं नावें कां ठेवण्यांत आलीं आहेत हें सोदाहरण दाखवा

२ पुढील वाक्याचा प्रयोग बदला —

१ नर उद्यमेन धनम् अधिगच्छति । २ अश्वा शरै सैनिकान् प्रहरन्ति ।
३ व्यायामेन आरोग्य वर्धते । ४ नृपा चारै राज्यतन्त्र पश्यन्ति ।
५ स्वयवरमण्डपे राजपुत्रा निषीदन्ति । ६ सेवका माम् अनुसरन्ति ।
७ यूयम् अरण्ये वसथ । ८ वृद्ध नृप पुत्रे राज्य * वितरति ।"
९ कृपणानाम् उत्कर्षेण देश समृध्यति । १० गुरु शुकाम् आह्वयति ।

३ पुढील वाक्यांत कंसांत दिलेल्या क्रियापदाची योग्य रूपें योजा —

१ विष्णु ध्रुवाय दर्शन (दा) । २ मनाय मैं. प्रयत्न (कृ) ।
३ मीडया चौरै (युद्) । ४ दुर्गस्य भदन सैनिका चौरै (प्रणम) ।
५ योधा अरान् (वि+जि) । ६ सुवर्णकारेण तुल्या सुवर्ण (तुल) ।

---

* टीप — वि+तृ—देणें इत्यादी अर्थी—या क्रियापदाचा उपयोग ज्याला द्यावयाचें त्याच्या षष्ठी करावयाचें त्याची भाषा योजून करतात, क्वचित् चतुर्थीहि योजतात

७ कृपालवै वर्षासु † क्षेत्रे बीजानि ( वप् )। ८ सिंहेन अरण्ये मृगा (वि+हृ)। ९ भाग स्वाकृत्यात् कार्यात् न ‡ ( वि+रम् )। १० जनन्या बाल क्रीडाङ्गणात् ( आहे )।

■ वरील प्रश्न ३ मध्यें दिलेल्या क्रियापदांचीं प्र० भूतकाळी रूपें वाक्यातील प्रयोगानुरूप लिहा

५ सन्धि करा —ग्रामात् ग्रामम् अटति पान्थ । वाक + ऐश्वर्यम्। वृक्ष अपतत् बालक । अवसत् एकदा ऋषि आश्रमे।

६ सन्धि सोडवून लिहा —दूरात्रामस्त दूतमीक्षते नृप । वृक्षाद्वृक्षमुत्प्लवन्ते वानरा । वनाद्रामा न्यवर्तत ।

# पाठ १६—कर्मणिभूतकालवाचक धातुसाधित विशेषणें व ल्यबन्त धातुसाधित अव्ययें.

कर्मणि भूतकालवाचक धातुसाधित विशेषणाचा उपयोग ,सामान्यपणे विशेषणाच्या धड्यात दाखविलेला आहे. परतु त्याचा उपयोग करताना वाक्य रचना विशिष्ट प्रकारचीं का असावा हें पुढील उदाहरणावरून ध्यानात येईल

१ राम निश्चयम् अकरोत्—रामेण निश्चय. अक्रियत-कृत था।
नृप. वार्ताम् अशृणोत्—नृपेण वार्ता अश्रूयत-श्रुता था।
बालः॰ चन्द्रस्य बिम्बम् अपश्यत्—बालेन चन्द्रस्य बिम्बम् अदृश्यत-दृष्ट था।

वरील वाक्यातील क्रियापदें सकर्मक आहेत म्हणून कर्मणि प्रयोगाची रचना करून त्यामध्ये क्रियापदाएवजी कर्मणि भू० का० धा० विशेषणें योजतां आली सकर्मक धातूचीं कर्मणि भू० का० धा० विशेषणें योजताना कर्मणि तऱ्हेचीच रचना करावी लागते

† टीप —वर्षा ( पावसाळा ) ■ स्त्रीलिंगी शब्द बहुवचनांत योजतात
‡ टीप —वि + रम् ( थांबणे ) या क्रियापदाचा उपयोग ज्या ठिकाण थांबावयाचें त्या कर्माच्या शब्दाचा पंचमी योजून करतात

२ समुद्रः वायुना अक्षुभ्यत्-क्षुब्धः वा। समुद्रेण वायुना अक्षुभ्यत-क्षुब्धम् वा।

अर्जुनः रणाङ्गणे अतिष्ठत्-स्थितः वा। अर्जुनेन रणाङ्गणे-अस्थीयत-स्थितं वा।

नृपः विजयेन अमोदत-मुदितः वा। नृपेण विजयेन अमुद्यत-मुदितं वा।

वरील वाक्यांतील क्रियापदें अकर्मक आहेत म्हणून अकर्मक धातूंचीं कर्मणि भू० का० धा० विशेषणें कर्तरि व भावे अशा दोन्ही तऱ्हेच्या रचनेमध्यें योजता येतात. कर्तरि वाक्यरचनेंत योजल्यास त्यांचीं रूपें प्रथमान्त कर्तृपदाप्रमाणें होतात व भावे वाक्यरचनेंत योजल्यास त्यांचीं रूपें न० प्रथमेच्या एकवचनांत असतात. यांपैकीं कर्तरि वाक्यरचनेंत योजण्याची पद्धति ज्यास्त प्रचारात आहे. परंतु काहीं ठिकाणीं दुसऱ्या तऱ्हेनेंहि उपयोग केलेला आढळतो. जसें—हसितं. स्मितम्-हसितम्।

टीप—विशेष माहिती सं० भाषेच्या पाठ १० मध्यें पहा।

वरील रूपें धातूला 'त' हा प्रत्यय जोडून करण्यात आलीं आहेत. काहीं धातूंना 'त' पूर्वी 'इ' हा स्वर जोडतात, काहींना विकल्पानें 'इ' जोडतात व काहींना मुळींच जोडीत नाहींत ज्या वेळेस 'इ' जोडीत नाहींत त्या वेळीं 'त' चा सन्धिनियमानुसार 'ट, ठ, ध, आणि न' होतो

## ल्यबन्त धातुसाधित अव्ययें

३ मुखं क्षालयित्वा बालः दुग्धं पिबति—तोंड धुवून मुलगा दूध पितो.

निराशः भूत्वा शृगालः न्यवर्तत—निराश होऊन कोल्हा परतला.

सीतां त्यक्त्वा रामः दुःखितः जातः—सीतेला टाकून राम दुःखी झाला.

पुस्तकानि आदाय बालः पाठशालां गतः—पुस्तकें घेऊन मुलगा शाळेंत गेला.

वृक्षस्य तले विश्रान्तिम् अनुभूय पान्थः चलितः—झाडाच्या बुधाशीं विश्रान्ति घेऊन वाटसरू चालूं लागला.

धर्मम् अनुसृत्य नरः पुण्यं लभते। धर्माप्रमाणें वागून मनुष्याला पुण्य लाभतें

वरील वाक्यांत **क्षालयित्वा, भूत्वा, त्यक्त्वा, आदाय, अनुभूय, अनुसृत्य** हीं **ल्यबन्त** अव्ययें योजलेलीं आहेत. वाक्याच्या रचनेवरून हें लक्ष्यांत येईल कीं ज्या वेळीं एकाच कर्तृपदाशीं एकाहून अधिक क्रियांचा संबंध असतो त्या वेळीं शेवटच्या क्रियेखेरीज इतर पुऱ्या झालेल्या क्रियांबद्दल ल्यबन्त अव्ययें योजतात.

टीप:—ल्यबन्त अव्ययाचा अर्थ मराठीतील ऊन-प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययाप्रमाणें होतो.
क्षालयित्वा–क्षाल्+अय+इ+त्वा । भूत्वा–भू+त्वा । त्यक्त्वा–त्यज्+त्वा
आदाय–आ+दा+य । अनुभूय–अनु+भू+य । अनुसृत्य–अनु+सृ+त्य ।

वरील पृथक्करणावरून हें लक्षात येईल कीं सामान्यपणें धातूला 'त्वा' हा प्रत्यय लावून 'ल्यबन्त' अव्ययें तयार करतात. परंतु उपसर्गसहित धातु असेल तर 'य' हा प्रत्यय लावतात आणि उपसर्गसहित धातूचा अन्त्य स्वर ह्रस्व असेल तर 'त्य' हा प्रत्यय जोडतात. 'त्वा' हा प्रत्यय जोडतांना कांहीं धातूंना 'त्वा' पूर्वी 'इ' जोडतात, कांहींना विकल्पानें जोडतात व कांहींना मुळींच जोडीत नाहींत.

*याच माहितीसाठी संस्कृत-वाक्यरचना पाठ २१ पहा

साधारणतः कर्मणि भू० का० धा० विशेषणाचा 'त' आणि ल्यबन्ताचा 'त्वा' यांपूर्वी धातूत सारखेच फरक होत असतात.

## कांहीं महत्त्वाच्या धातूंचीं रूपें

| १ स्वरान्त धातूंत फरक न होणारी | स्वरान्त धातूंत फरक होणारी |
|---|---|
| ज्ञा – ज्ञात – ज्ञात्वा ( अनुज्ञाय ) | दा – दत्त – दत्वा (आदाय) |
| जि – जित – जित्वा ( विजित्य ) | पा – पीत – पीत्वा (निपीय) |
| श्रि – श्रित – श्रित्वा ( आश्रित्य ) | स्था – स्थित – स्थित्वा (प्रस्थाय) |
| नी – नीत – नीत्वा ( आनीय ) | उद् + स्था – उत्थित – उत्थाय |
| भू – भूत – भूत्वा ( अनुभूय ) | डी – डीन – डयित्वा (उड्डीय) |
| कृ – कृत – कृत्वा ( अनुकृत्य ) | तॄ – तीर्ण – तीर्त्वा (अवतीर्य) |
| धृ – धृत – धृत्वा ( उद्धृत्य ) | गै – गीत – गीत्वा (अनुगीय) |
| सृ – सृत – सृत्वा ( अनुसृत्य ) | श्रै – श्राण/श्रात – श्रात्वा (परिश्राय) |
| हृ – हृत – हृत्वा ( प्रहृत्य ) | |

२ धातूंतील य्, व्, र् बद्दल इ, उ, ऋ असा फरक होणारीं

| | |
|---|---|
| यज् – इष्ट – इष्ट्वा (प्रेज्य) | वह् – ऊढ – ऊढ्वा (प्रोह्य) |
| वद् – उदित – उदित्वा (अनूद्य) | व्यध् – विद्ध – विद्ध्वा (अनुविध्य) |
| वप् – उप्त – उप्त्वा (प्रोप्य) | स्वप् (२ ग प प.) सुप्त – सुप्त्वा (प्रसुप्य) |
| वच् (२ ग प प) – उक्त – उक्त्वा (प्रोच्य) | ह्वे – हूत – हूत्वा (आहूय) |
| | ग्रह् – गृहीत – गृहीत्वा (अनुगृह्य) |
| वस् – उषित – उषित्वा (प्रोष्य) | प्रच्छ् – पृष्ट – पृष्ट्वा (आपृच्छ्य) |

३ धातूंतील अन्त्य म् किंवा न् चा लोप होणारीं

| | |
|---|---|
| गम् – गत – गत्वा (आगम्य त्य) | मन् – मत – मत्वा (अनुमन्य-त्य) |
| नम् – नत – नत्वा (प्रणम्य त्य) | हन् (२ ग प प) हत – हत्वा (विहन्य-त्य) |
| यम् – यत – यत्वा (संयम्य त्य) | खन् – खात – खनित्वा – खात्वा (निखाय) |
| रम् – रत – रत्वा (विरम्य त्य) | जन् – जात – जनित्वा (संजन्य) |

| | |
|---|---|
| ४ पच् – पक्व – पक्त्वा (विपच्य) | तप् – तप्त – तप्त्वा (सन्ताप्य) |
| सिच् – सिक्त – सिक्त्वा (अभिषिच्य) | लिप् – लिप्त – लिप्त्वा (विलिप्य) |
| मुच् – मुक्त – मुक्त्वा (उन्मुच्य) | शप् – शप्त – शप्त्वा (संशप्य) |
| त्यज् – त्यक्त – त्यक्त्वा (सन्त्यज्य) | क्षुभ् – क्षुब्ध – क्षुब्ध्वा (प्रक्षुभ्य) |
| भज् – भक्त – भक्त्वा (विभज्य) | रभ् – रब्ध – रब्ध्वा (आरभ्य) |
| भुज् (७ ग प प) भुक्त – भुक्त्वा (उपभुज्य) | लभ् – लब्ध – लब्ध्वा (विप्रलभ्य) |
| युज् – युक्त – युक्त्वा (प्रयुज्य) | |

| | |
|---|---|
| ५ सृज् – सृष्ट – सृष्ट्वा (विसृज्य) | स्पृश् – स्पृष्ट – स्पृष्ट्वा (उपस्पृश्य) |
| दिश् – दिष्ट – दिष्ट्वा (सन्दिश्य) | विश् – विष्ट – विष्ट्वा (प्रविश्य) |
| दंश् – दष्ट – दष्ट्वा (सन्दश्य) | कृष् – कृष्ट – कृष्ट्वा (आकृष्य) |
| नश् – नष्ट – नष्ट्वा-नंष्ट्वा-नशित्वा (प्रणश्य) | तुष् – तुष्ट – तुष्ट्वा (सन्तुष्य) |
| मृश् – मृष्ट – मृष्ट्वा (विमृश्य) | पुष् – पुष्ट – पुष्ट्वा (संपुष्य) |

**३५ नियमः**—'त-वर्गाची व्यन्जनें आणि स' याचा आणि 'च-वर्गाची व्यन्जनें आणि श्' याचा सन्धि होताना त् बद्दल च्, द् बद्दल ज्, ध् बद्दल झ्, न् बद्दल ञ् आणि स् बद्दल श् असे फरक होतात

तस्मात् शत्रो घन रमन्ते सैनिका —तस्माच्छात्रो किंवा तस्माच्छत्रो ...
तद् श्मशान भीषणम् तच्श्मशान किंवा तच्छ्मशान
गृहात् श्वः गच्छति राम —गृहाच्श्वः किंवा गृहाच्छ्वः

**३६ नियमः**—वरील ३५ नियमानुसार पहिल्यानें 'त् चा च्' झाला आहे आणि विकल्पानें 'श् चा छ्' झाला आहे 'श्'नें आरंभ होणाऱ्या शब्दापूर्वी कोणत्याहि वर्गांचें अनुनासिकाशिवाय इतर व्यन्जन आल्यास आणि 'श्'च्या पुढें स्वर, अन्तःस्थ वर्ण किंवा अनुनासिक असल्यास 'श्'चा विकल्पानें 'छ' होतो

अभवत् षोडश बाल गुरु —अभवद् षोडश
रथात् डयन्ते शुका —रथाद् डयन्ते-रथाड्डयन्ते
विविधान् प्रदेशान् डयन्ते खगा —प्रदेशाण्डयन्ते

**३७ नियम.**—'त-वर्गांचें व्यन्जन आणि स्' याचा 'ट-वर्गांचें व्यन्जन आणि ष्' याच्याशी सन्धि होताना त् चा ट, द् चा ड, ध् चा ट, न् चा ण् आणि स् चा ष् असा फरक होतो

## नवीन शब्द

(अ) आश्रम, क्लेश, निराश (वि), मारुति (पु), स्पृहा, शरणम्, श्मशानम्

| | | |
|---|---|---|
| (आ) अचिरात् (अ)—लवकरच | जरासन्धः—चेदि देशाचा राजा | द्वन्द्वम्—द्वन्द्वयुद्ध |
| अजः—रघुवंशातील राजाचें नांव | ज्वर.—ताप | निषाद.—पारधी |
| काञ्चनमृगः—सोनेरी हरिण | तटम्—तट, कुश | प्रासाद—राजवाडा |
| क्रौञ्च.—पक्ष्याचें नांव | तूष्णीम् (अ)—स्वस्थपणें, स्तब्धपणें | महाश्वेता—गन्धर्व कन्येचें नांव |
| गौतम.—बुद्धाचें नांव | | शृगालः—कोल्हा |

# पाठ-१७ ऋकारान्त नामें.

१ नृणाम् ( लोकांचा ) अधिपतिः दशरथः अयोध्यायाम् अवसत् । तस्य चत्वारः पुत्राः एका च दुहिता ( मुलगी ) शान्ता नाम । तस्य सुमन्त्रः नाम सव्येष्टा ( सारथि ) । पितुः ( वडिलांच्या ) आज्ञया रामः भ्रात्रा सह ( भावाबरोबर ) धनुर्विद्याम् अशिक्षत । रामस्य भार्या सीता । भर्तरि ( नवऱ्यावर ) रामे तस्याः परमा प्रीतिः । तथा च देवुः ( दिराचा ) लक्ष्मणस्य यातरि ( भावजयीसंबंधीं ) मातृवत् आदरः । सीतायाः अपि ननान्दरि ( नणंदेच्या ठिकाणीं ) शान्तायाम् आदरः । रामस्य स्वसुः ( बहिणीचा ) शान्तायाः भर्ता ( नवरा ) ऋष्यशृङ्गः । तेन सत्रम् आरब्धम् । तदा रामस्य मातरः ( आया ) जामातुः ( जावयाच्या ) गृहम् अगच्छन् । रामस्य पुत्रौ लवकुशौ दशरथस्य नप्तारौ ( दोघे नातू ) ।

वरील वृत्तान्यात ऋकारान्त पु० व स्त्री० नामें योजिलेलीं आहेत. तीं पुढीलप्रमाणे

पु०—पितृ, भ्रातृ, जामातृ, देवृ, नृ, सव्येष्टृ, भर्तृ, नप्तृ

स्त्री०—मातृ, दुहितृ, ननान्दृ, यातृ, स्वसृ.

पु० नामें 'भर्तृ व नप्तृ' शिवाय 'पितृ' प्रमाणें चालवावीं व स्त्री० नाम 'स्वसृ' शिवाय 'मातृ' प्रमाणें चालवावीं.

२ ऋकारान्तः पुंलिङ्गः पितृशब्दः । ऋकारान्तः स्त्रीलिङ्गः मातृशब्दः ।

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पिता | पितरौ | पितर | प्र | माता | मातरौ | मातर |
| पितरम् | ,, | पितॄन् | द्वि. | मातरम् | ,, | मातॄ |
| पित्रा | पितृभ्याम् | पितृभि | तृ. | मात्रा | मातृभ्याम् | मातृभि |
| पित्रे | ,, | पितृभ्य | च. | मात्रे | ,, | मातृभ्य |
| पितु | ,, | ,, | पं. | मातु | ,, | ,, |
| ,, | पित्रो | पितॄणाम् | ष. | ,, | मात्रो | मातॄणाम् |
| पितरि | ,, | पितृषु | स. | मातरि | ,, | मातृषु |
| हे पितर् | हे पितरौ | हे पितर | सं. | हे मातर् | हे मातरौ | हे मातर |

'भर्तृ व नप्तृ ' हे पितृप्रमाणे व 'स्वसृ' हा मातृप्रमाणे प्रथमा, द्वितीया व संबोधन शिवाय इतर विभक्तींमध्ये चालवावे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| भर्तृ—प्रथमा — | भर्ता | भर्तारौ | भर्तार | स्वसृ—स्वसा स्वसारौ स्वसार |
| द्वितीया— | भर्तारम् | ,, | भर्तॄन् | स्वसारम् ,, स्वसॄ |
| स० — | भर्तर् | ,, | भर्तार | स्वसर् ,, स्वसार |

३ नृ शब्दाची रूपे —ना नरौ नर प्र., नरम् नरौ नॄन् द्वि., न्रा नृभ्याम् नृभि· तृ., न्रे नृभ्याम् नृभ्य च., नुः नृभ्याम् नृभ्य पं., नुः न्रोः नृणाम्-नॄणाम् ष., नरि न्रोः नृषु स., नर् नरौ नर सं.

४ कर्तृवाचक शब्द ( तृ–प्रत्ययान्त )

विश्वस्य स्रष्टुः ( उत्पत्तिकर्त्याचे ) चातुर्यम् अवर्णनीयम् ।

राज्यस्य रक्षितृभ्यः ( रक्षण करणाऱ्यांना ) नृपः पारितोषिकाणि यच्छति ।

सन्मार्गं नेतृणः ( नेणाऱ्या ) मित्रस्य साहाय्यम् इच्छति नरः ।

शूराः कलत्राः अपि राष्ट्रस्य रक्षितृ्यः ( रक्षण करणाऱ्या ) भवन्ति ।

कार्यस्य आरम्भे विघ्नानाम् अपहर्तॄणि ( नाश करणाऱ्या ) दैवतानि पूजयन्ति नराः ।

अधुना भारतवर्षे ग्रन्थानां कर्त्रीणां (रचणाऱ्या स्त्रियांचे) बाहुल्यं वर्तते।

वरील वाक्यात स्रष्टृ, रक्षितृ, नेतृ, अपहर्तृ, कर्तृ इत्यादि धातुंना 'तृ' प्रत्यय लावून झालेले 'क्रिया करणारा' अशा अर्थाचे शब्द तीन्ही लिंगामध्ये उपयोगात आणलेले आहेत ज्याच्या ध्यान 'तृ'-कारान्त शब्दाचा उपयोग करावयाचा असतो त्याच्या लिंग, विभक्ति आणि वचन यांप्रमाणे त्याचा उपयोग करावा लागतो

## तृ-कारान्त शब्दांची पुल्लिंगी रूपे ( नेतृ–पु )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नेता | नेतारौ | नेतार | प्र. | नेतु | नेतृभ्याम् | नेतृभ्य | पं. |
| नेतारम् | ,, | नेतॄन् | द्वि. | ,, | नत्रा | नेतॄणाम् | ष. |
| नेत्रा | नेतृभ्याम् | नेतृभि | तृ. | नेतरि | ,, | नेतृषु | स. |
| नेत्रे | ,, | नेतृभ्य | च. | हे नेतर् | हे नेतारौ | हे नेतार | सं. |

स्त्रीलिंगी रूपें करतांना 'ई' हा प्रत्यय जोडून नंतर 'नदी' प्रमाणे चालवावे.

नेतृ + ई – नेत्री, कर्तृ + ई – कर्त्री, रक्षितृ + ई – रक्षित्री.

| नेत्री | नेत्र्यौ | नेत्र्यः | प्र. | नेत्र्याः | = | नेत्रीभ्यः | पं. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नेत्रीम् | ,, | नेत्रीः | द्वि. | नेत्र्याः | नेत्र्योः | नेत्रीणाम् | ष. |
| नेत्र्या | नेत्रीभ्याम् | नेत्रीभिः | तृ. | नेत्र्याम् | = | नेत्रीषु | स. |
| नेत्र्यै | ,, | नेत्रीभ्यः | च. | नेत्रि | नेत्र्यौ | नेत्र्य. | सं. |

## तृ-कारान्त शब्दांचीं नपुंसकलिंगी रूपें

| नेतृ | नेतृणी | नेतृणि | प्र. | नेतृणः | नेतृभ्याम् | नेतृभ्यः | पं. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ,, | ,, | ,, | द्वि. | नेतृणः | नेतृणोः | नेतृणाम् | ष. |
| नेतृणा | नेतृभ्याम् | नेतृभिः | तृ. | नेतृणि | ,, | नेतृषु | स. |
| नेतृणे | ,, | नेतृभ्यः | च. | हे नेतृ तर् | हे नेतृणी | हे नेतृणि | सं. |

कांहीं तृ-कारान्त शब्दः—दातृ-देणारा, द्रष्टृ-पाहाणारा, ज्ञातृ-जाणणारा, श्रोतृ-ऐकणारा, वक्तृ-बोलणारा, जेतृ-जिंकणारा, रचयितृ-रचणारा, हर्तृ-नेणारा, पूजयितृ-पूजा करणारा.

## सन्धिनियम

आकाशात् लोकान् पश्यति देवः—आकाशाल्लोकान् ...... ।

अपश्यत् लोचनाभ्यां रम्यं स्थलं बालः—अपश्यल्लोचनाभ्यां ...... ।

३८ नियमः—'त्' या व्यंजनापुढें 'ल्' नें आरंभ झालेला शब्द आल्यास 'त्' चा 'ल्' होतो.

समिध् + खण्डः—समित्खण्डः ( समास )-समिधेचा तुकडा.

ककुभ् + प्रदेशः—ककुप्प्रदेशः ( ,, )-दिशेचा प्रदेश.

विपद् पीडयति नरम्—विपत्पीडयति......संकट मनुष्याला त्रास देतें.

३९ नियमः—घोषवादि वर्णांच्या अनुनासिकाशिवाय इतर व्यंजनापुढें कठोर व्यंजन आल्यास, मागील व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें पहिलें अक्षर येतें.

धनिकात् हरति धनं चोरः—धनिकाद् हरति किंवा धनिकाद्धरति ।

सूनृता* वाक् हरति चित्तस्य क्लेशम्—वाग् हरति किंवा वाग्घरति । *(वाणी-शब्द)

**४० नियम.**—'ह्' ने आरंभ होणाऱ्या शब्दापूर्वी अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजन आल्यास 'ह्' बद्दल विकल्पानें मागील व्यंजनाच्या वर्गाचें चौथें अक्षर येतें

वृक्ष + छाया — वृक्षच्छाया, तरु + छाया — तरुच्छाया,
मा + छेदय — माच्छेदय, आ + छादयति — आच्छादयति,

परंतु

लक्ष्मी + छाया — लक्ष्मीछाया किंवा लक्ष्मीच्छाया.

**४१ नियमः**—'छ्'च्या पाठीमागें ऱ्हस्व स्वर, **मा** हें निषेधार्थी अव्यय, आणि **आ** हा उपसर्ग आल्यास, 'छ्' ला 'च्' हें व्यंजन जोडतात. आणि 'छ'च्या पूर्वी इतर दीर्घ स्वर असल्यास 'च्' विकल्पानें जोडतात

## नवीन शब्द

| | | |
|---|---|---|
| **अन्तरेण** (अ)-शिवाय, सबंधी | **धनुर्विद्या**—धनुष्यानें लढण्याची विद्या | **शल्यः**—मद्र देशाच्या राजाचे नाव |
| **कर्णः**—भारतीय वीराचें नाव | **नियन्तृ** (पु)—ताबा चालविणारा | **सत्रम्**—मोठा यज्ञ |
| | | **साहाय्यम्**—मदत |
| **चातुर्यम्**—हुशारी | **पाशः**—दोरी, जाळें | **सुग्रीवः**—वानरश्रेष्ठ, किष्किंधेचा राजा |
| **दण्ड्** (१०उ प.)-शिक्षा करणें | **बाहुल्यम्**-पुष्कळ सापडणें | **सूनृत** (वि)-मृदु, सभ्य |
| | **यमः**—देवाचें नाव | |
| **दैवतम्**—देवता | **रङ्गः**—रङ्गभूमि | **स्तेनः**—चोर |

**टीप**—**अन्तरेण** या अव्ययाचा उपयोग द्वितीयान्त शब्दाबरोबर केला जातो

—

### प्रश्न

१ पुढील वाक्यात कंसातील ऋ-कारान्त शब्दांची योग्य ती रूपें योजा —

१ सैनिकाः (नेतृ) उपदेशं न अन्वगच्छन् अतः ते पराजीयन्त ।
२ सीतायाः त्यागेन तस्याः (मातृ) वसुन्धरा (जामातृ) अकुप्यत् ।
३ सुग्रीवः (भ्रातृ) सार्धं किमर्थम् अयुध्यत ।
४ (सव्येष्टृ) शल्येन कुरूणां सेनापतिः कर्णः निर्भर्त्सितः ।

५ ( विधातृ ) इच्छा केनापि न लङ्घ्यते ।

६ कृष्णेन ( स्वसृ ) सुभद्रायाः विवाहः अर्जुनेन सह कृतः ।

७ धनस्य ( अपहर्तृ ) स्तेनं नृपः अदण्डयत् ।

८ सावित्री ( भर्तृ ) यमस्य पाशेभ्यः अमुञ्चत् ।

९ बाल. ( पितृ ) हृदयम् आह्लादयति ।

१० अधुना भारतवर्षे बहुशः ( अभिनेतृ ) ललना रङ्गम् अवतीर्णा ।

२ पुढील रूपें ओळखून त्यांचा पुढील वाक्यांत उपयोग करा:—

नृणाम्, पितरौ, नप्तारौ, निमन्तृ, द्रष्टारः, जेतारम्, गन्तारः, योद्धारः, धातारम्, दुहितुः, उपदेष्टारः ।

१ मूर्खः          निन्दति ।

२ दशरथस्य — — — लवः कुशः च ।

३ गङ्गायाः जलेन ———— पापानि नश्यन्ति ।

४ ———— विवाहम् अन्तरेण ——          चिन्तातुरौ भवतः ।

५ अप्रियस्य पथ्यस्य ———— विरलः ।

६ नृपस्य पश्चात् ——          अभावात् शत्रुणा देशः आक्रान्तः ।

७ ऋषयः मन्त्राणा ——— सन्ति न तु कर्तारः ।

८ कौरवाणां पाण्डवानां च बहवः ———— रणे पतिताः ।

९ प्रजाः          — राज्ये समस्थापयन् ।

१० विमार्गेण          — गर्दे पतन्ति ।

३ तृ-प्रत्ययान्त धातुसाधित कर्तृवाचक शब्दांचा तीनही लिंगांत उपयोग करून दाखवा.

४ संधि करा:—लोभात् जायते क्रोधः । दक्षिणात् हस्तात् लेखनी पतिता । नरः ईश्वरस्य पूजनात् शान्तिं लभते ।

५ संधि सोडवून लिहा —प्रासादाग्रमारूढाज्जानाति वार्तां नृपः । राज्याच्छ्रष्टो भीमो लब्धः । स्वर्गाद्भोजनानीशस्य ईश्वरः । अत्यन्तर्दीनो मनुष्यस्य धर्ता ।

# पाठ १८–तुवन्त धातुसाधित अव्ययें.

१ भक्तः ईश्वरस्य दर्शनाय ( ईश्वरं द्रष्टुं ) देवालयं गच्छति ।
बाला क्रीडाङ्गणं क्रीडायै ( क्रीडितुं ) गच्छन्ति ।
वातस्य सेवनाय ( वातं सेवितुं ) जनाः समुद्रस्य तीरम् आश्रयन्ति ।
जना॰ धनस्य लाभं ( धनं लब्धुम् ) इच्छन्ति ।

वरील पहिल्या तीन वाक्यांमध्यें धातूला 'तुम्' प्रत्यय लावून तयार केलेलीं रूपें उपयोगांत आणिलेलीं आहेत. त्यांचा उपयोग 'धातूनें दर्शविलेली क्रिया करण्याकरितां' अशा अर्थी केला जातो, म्हणून सामान्यतः हीं तुवन्त रूपें धातुसाधित अव्ययें आहेत क्वचित् ठिकाणीं चौथ्या वाक्याप्रमाणें यांचा उपयोग कर्मपदाप्रमाणेंहि होतो काहीं धातूंना 'तुम्' प्रत्यय 'इ' स्वरासहित, काहींना 'इ' स्वराशिवाय, व काहींना विकल्पानें 'इ' स्वरासहित लावतात काहीं विशिष्ट धातूंचीं तुवन्त रूपें पुढें दिलीं आहेत

मागील पाठांत सांगितलेल्या कर्तृवाचक विशेषणाचा 'तृ' प्रत्यय धातूला लावतांना, 'तुम्' प्रत्यय लावतांना जो फेरफार करावयाचा, तोच करावा लागतो

२ 'तव्य'–प्रत्ययान्त कर्मणि विध्यर्थक धातुसाधित विशेषणें.

छात्रैः अध्ययनं कर्तव्यम्–विद्यार्थ्यांनी अध्ययन करावें ( केलें पाहिजे )
नरेण उपकारः स्मर्तव्यः–मनुष्यानें उपकार स्मरावा ( स्मरला पाहिजे )
गोपालेन धेनुः रक्षितव्या–गोपाळानें गाईचें रक्षण करावें ( केलें पाहिजे, करणें योग्य आहे )

वरील वाक्यांतून 'क्रिया केली पाहिजे किंवा करणें योग्य आहे' असा अर्थाचीं 'तव्य'–प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणें सकर्मक धातूंचीं आहेत म्हणून त्यांचा उपयोग करतांना वाक्याची रचना कर्मणि तऱ्हेची झाली आहे, व त्यांचीं रूपें प्रथमान्त कर्मपदाप्रमाणें लिंग, विभक्ति व वचन यांमध्यें झालीं आहेत, व कर्तृपदवाचक शब्द तृतीयांत योजिले आहेत

३ नृपैः शत्रुणा सह योद्धव्यम्-राजांनीं शत्रूबरोबर लढावें.

छात्रैः गुरोः आगमने उत्थातव्यम्-विद्यार्थ्यांनीं शिक्षकाच्या येण्याच्या वेळ्या उठलें पाहिजे.

नरैः सन्मार्गेण गन्तव्यम्-लोकांनीं चांगल्या मार्गानें जावें.

वरील वाक्यांत 'तव्य'-प्रत्ययान्त रूपें 'क्रिया करावी किंवा केली पाहिजे' अशा अर्थाचीं अकर्मक धातूंचीं रूपें योजलेलीं आहेत अर्थात् कर्तृपदवाचक शब्द तृतीयेंत आहे आणि क्रियावाचक धातुसाधिताचें रूप नपुंसकलिंगीं एकवचनी आहे.

'तव्य' प्रत्यय धातूंना लावतांना 'तुम्' किंवा 'तृ' प्रत्ययाप्रमाणेंच धातूमध्यें फरक करावे लागतात

-

| | | |
|---|---|---|
| त्यज्-त्यक्तुम्-त्यक्तव्य | मन्-मन्तुम्-मन्तव्य | कृष्-क्रष्टुम्-क्रष्टव्य |
| मस्ज्-मङ्क्तुम्-मङ्क्तव्य | हन्-हन्तुम्-हन्तव्य | -कर्ष्टुम्-कर्ष्टव्य |
| यज्-यष्टुम्-यष्टव्य | क्षिप्-क्षेप्तुम्-क्षेप्तव्य | वस्-वस्तुम्-वस्तव्य |
| युज्-योक्तुम्-योक्तव्य | सृप्-सर्प्तुम्-सर्प्तव्य | दह्-दग्धुम्-दग्धव्य |
| सृज्-स्रष्टुम्-स्रष्टव्य | स्रप्तुम्-स्रप्तव्य | नह्-नद्धुम्-नद्धव्य |
| दृश्-द्रष्टुम्-द्रष्टव्य | लभ्-लब्धुम्-लब्धव्य | रुह्-रोढुम्-रोढव्य |
| पद्-पत्तुम्-पत्तव्य | रभ्-रब्धुम्-रब्धव्य | वह्-वोढुम्-वोढव्य |
| | गम्-गन्तुम्-गन्तव्य | |
| | नम्-नन्तुम्-नन्तव्य | |
| | रम्-रन्तुम्-रन्तव्य | |

## तुम् व तव्य या प्रत्ययांपूर्वी 'इ' घेणारीं रूपें

| | | |
|---|---|---|
| वद्-वदितुम्-वदितव्य | नृत्-नर्तितुम्-नर्तितव्य | कम्प्-कम्पितुम्-कम्पितव्य |
| मुद्-मोदितुम्-मोदितव्य | ईक्ष्-ईक्षितुम्-ईक्षितव्य | कुप्-कोपितुम्-कोपितव्य |
| रक्ष्-रक्षितुम्-रक्षितव्य | वृध्-वर्धितुम्-वर्धितव्य | जन्-जनितुम्-जनितव्य |
| जीव्-जीवितुम्-जीवितव्य | वृत्-वर्तितुम्-वर्तितव्य | |

## दहाव्या गण व प्रयोजक धातूंचीं रूपें

| | |
|---|---|
| कथ्-कथयितुम्-कथयितव्य | कृ (प्र) — कारयितुम्—कारयितव्य |
| तड्-ताडयितुम्-ताडयितव्य | दृश् (प्र) — दर्शयितुम्—दर्शयितव्य |
| प्री-प्रीणयितुम्-प्रीणयितव्य | स्था (प्र) — स्थापयितुम्—स्थापयितव्य |
| घुष्-घोषयितुम्-घोषयितव्य | तुष् (प्र) — तोषयितुम्—तोषयितव्य |

---

### प्रश्न

१. पुढील वाक्यांत तुमन्त रूपें घाला ( कंसातील धातूंचीं ) —

१ गुरुस्य वृत्तान्तं ( श्रु ) सर्वे शिष्याः आचार्यं परितः उपविष्टाः ।

२ कार्यम् ( आ+रभ् ) सर्वे तत्पराः भवन्ति ।

३ राज्यभारं ( वह् ) सचिवाः इच्छन्ति ।

४ विश्वामित्रः दशरथं रामलक्ष्मणौ ( याच् ) अयोध्यां प्राप ।

# पाठ–१९ आज्ञार्थ.

१ राम कृष्ण गोविन्द गोपाल च गुरुणा सह क्रीडाङ्गणम् अगच्छन्। तदा राम गुरुम् अवदत्—अहं कन्दुकेन क्रीडानि रमै वा ( मला चडूने खेळू द्या )। गुरु प्रत्यवदत्—त्वं क्रीड रमस्व वा ( खेळ ) कृष्ण अपि क्रीडतु रमताम् वा ( खेळू दे )। गोपाल गोविन्द च गुरुम् अकथयताम्—आवाम् अपि क्रीडाव रमावहै वा ( आम्हाला दोघांना खेळू द्या )। वयं सर्व मिथ ( एकत्र ) क्रीडाम रमामहै वा (आम्हा सर्वांना खेळू द्या)। तदा गुरु अवदत्—हे गोविन्द हे गोपाल युवाम् क्रीडतम् रमेथाम् वा ( तुम्ही दोघ खेळा )। एव यूय सर्वे क्रीडत रमध्वम् वा (तुम्ही सर्व खेळा)। रमन्ताम् क्रीडन्तु वा ( खेळू द्या ) एते बाला स्वैरम् इति उक्त्वा गुरु गृह न्यवर्तत।

वरील उताऱ्यात 'क्रीड् व रम्' या प्रथमगणी परस्मैपदी व आत्मनेपदी धातूंची आज्ञार्थी रूपें योजलेली आहेत त्याच्या अर्थावरून असें ध्यानांत येईल की 'हुकूम करणे' हा अर्थ फक्त द्वितीय पुरुषातच होतो प्रथमपुरुष व तृतीयपुरुष रूपाच्या अर्थावरून इच्छा अपेक्षा, आशीर्वाद व अनुज्ञा यांपैकी कोणता तरी एक अर्थ दर्शविला जातो

२ क्रीड्—परस्मैपद आज्ञार्थ रम्—आत्मनेपद

| क्रीड्—परस्मैपद | | | | रम्—आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| क्रीडानि | क्रीडाव | क्रीडाम | प्र पु | रमै | रमावहै | रमामहै |
| क्रीड | क्रीडतम् | क्रीडत | द्वि पु | रमस्व | रमेथाम् | रमध्वम् |
| क्रीडतु | क्रीडताम् | क्रीडन्तु | तृ पु | रमताम् | रमेताम् | रमन्ताम् |

वरील रूपांचें पृथक्करण केल्यास पुढील प्रत्यय दिसून येतात —

| प्रत्यय — प प | | | प्रत्यय — आ प | | |
|---|---|---|---|---|---|
| आनि | आव | आम | ऐ | आवहै | आमहै |
| — | तम् | त | स्व | इथाम् | ध्वम् |
| तु | ताम् | अन्तु | ताम् | इताम् | अन्ताम् |

हे प्रत्यय धातूंना लावून रूपें बनविण्याची पद्धति वर्तमानकाळ व प्रथम भूतकाळ यांप्रमाणेच आहे. धातु ( विकार ) + विकरण + प्रत्यय.

प. प. आ. प.

३ ४ ग. नृत् + य + आनि – नृत्यानि । युध् + य + ताम्—युध्यताम् ।
६ ग. इष् (इच्छ्)+ अ + अन्तु–इच्छन्तु । विद् (विन्द् )+अ+ इथाम्–विन्देथाम्
१० ग. प्री ( प्रीण् ) + अय – प्रीणय । मन्त्र् + अय + ध्वम्–मन्त्रयध्वम् ।

वरील रूपांवरून ४, ६ व १० गणांच्या धातूंचीं दोन्ही पदांमध्यें आज्ञार्थी रूपें कशीं होतात हें दिसून येईल.

४ पान्थः वृक्षस्य छायायाम् उपविशतु–पान्थेन वृक्षस्य छायायाम् उपविश्यताम् ।
त्वम् आलेख्यं पश्य – त्वया आलेख्यं दृश्यताम् ।
यूयं माम् अनुसरत – युष्माभिः अहम् अनुस्रिये ।
महाराजः मम वचनं शृणोतु–श्रूयतां मम वचनं महाराजेन ।

वरील वाक्यें कर्तरि व कर्मणि–भावे प्रयोगांत लिहिलेली आहेत. कर्मणि प्रयोगाचीं रूपें करताना मूळ धातु घेऊन ( जरूर तो कर्मणि 'य' पूर्वी होणारा फरक करून ) कर्मणि रूपाचें य हें चिन्ह व आत्मनेपदी प्रत्यय जोडलेले आहेत.

जसें —उप + विश् + य + ताम्–उपविश्यताम् ।
दृश् + य + ताम्–दृश्यताम् । अनु + ( सृ ) स्रि + य + ऐ–अनुस्रिये ।

आज्ञार्थाच्या कर्मणि तृ० पु० एकवचनाचा उपयोग विनंतिवाचक अर्थ असताना केला जातो.

५ हे बालाः असत्यं मा वदत ( बोलूं नका )।
कौरवाः बालेन अभिमन्युना सह मा युध्यन्ताम् ( लढूं देऊं नका )।

आज्ञार्थांच्या रूपाबरोबर 'न' या निषेधार्थी अव्ययाच्या ऐवजीं 'मा' या अव्ययाचा उपयोग करतात.

टीप —आज्ञार्थांच्या निरनिराळ्या उपयोगांविषयीं सं० वाक्यरचना पाठ १९ पहा.

६ अस्—( २ ग. प. प. )
असानि असाव असाम । एधि स्तम् स्त । अस्तु स्ताम् सन्तु ।

कृ—( ८ ग प प )

करवाणि करवाव करवाम । कुरु कुरुतम् कुरुत । करोतु कुरुताम् कुर्वन्तु ।

ज्ञा—( ९ ग प प )

जानानि जानाव जानाम । जानीहि जानातम् जानीत । जानातु जानाताम् जानन्तु

ग्रह—( ९ ग प प )

गृह्णानि गृह्णाव गृह्णाम । गृहाण गृह्णातम् गृह्णीत । गृह्णातु गृह्णाताम् गृह्णन्तु ।

श्रु—( ५ ग प प )

शृणवानि शृणवाव शृणवाम । शृणु शृणुतम् शृणुत । शृणोतु शृणुताम् शृण्वन्तु ।

---

## प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसातील धातूंची आज्ञार्थी योग्य तीं रूपें योजा —

१ सर्वे जना सुखम् ( अनु+भू ) ।
२ शत्रून् ( वि+जि ) इति गुरुणा आशीर्वाद दत्त ।
३ अपि मित्र गृह ( आ+गा ) इति बाल जनकम् अपृच्छत् ।
४ दूत राजधानीं ( गम् ) नृपाय च सन्देश ( नि+विद्–प्र० ) ।
५ ( क्षिप ) बाण जयद्रथे इति अर्जुन कृष्णेन आदिष्ट ।
६ पुत्र ( लभ् ) गुणं राघवम् इति वैयाकरणेन उक्तम् ।
७ ईश्वर ( मुच ) माम् एतस्मात् सङ्कटात् ।
८ ( वृष् ) काले पर्जन्य ( भू ) च सुभिक्ष सर्वत्र ।
९ ( गम् ) त्वया गोदावरीतीरेण ।
१० ( नश् ) अस्माकं सङ्कटानि ईश्वरस्य कृपया ।

२ पुढील रूपें काय आहेत हें सांगून दिलेल्या वाक्यांत योग्य ठिकाणीं योजा —
श्रूयताम्, उड्डयध्वम्, उद्घोष्यताम्, आहूयताम्, अनुसरन्तु ।

१ सर्वे नृपा द्रौपद्या स्वयंवरायम् ——— ।
२ गुरूणां वचन ——— छात्रा ।
३ ——— हेतु दूतस्य आगमने ।

४ भो कपोता ——— समम् एव जालेन सह ।
५ ——— नृपस्य आज्ञा सर्वत्र ।

३ प्रश्न २ मधील वाक्याचा प्रयोग बदला —

टीप —वैसानस —यति सुभिक्षम्—सुकाळ, झुकवा समम् एव (अव्यय)—एकदम, एकाच वेळीं

---

# पाठ २०—विध्यर्थ.

१ भूपतयः वसुधां नयेन रक्षेयु. (रक्षण करावें) ।
अहं किं पठेयम् (शिकावें) अधुना इति त्वं मन्यसे ।
त्वं नीचैरायं गिरिम् अधिरोहेः (चढावें) इति यक्षः मेघम् अवदत् ।
यूयं विजयं लभेध्वम् (मिळवावा-मिळो) इति अहम् आशंसे ।
प्रबलेन रिपुणा सार्धं न युध्येत (लढू नये) दुर्बल. ।
वयम् अधुना उड्डयेमहि (उडून जावें) इति खगाः अवदन् ।

वरील वाक्यांच्या अर्थावरून असें दिसून येईल कीं क्रियापदाचीं रूपें विध्यर्थामध्यें योजलेलीं आहेत सामान्यत 'क्रिया करावी अथवा करणे योग्य आहे' अशा अर्थी विध्यर्थाचा उपयोग करतात

२ रक्ष् (१ प. प) | लभ् (१ आ प)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अह रक्षेयम् | आवा रक्षेव | वय रक्षेम | अह लभेय | आवा लभेवहि | वय लभेमहि |
| त्व रक्षे | युवा रक्षेताम् | यूय रक्षेत | त्व लभेथा | युवा लभेयाथाम् | यूय लभेध्वम् |
| स रक्षेत् | तौ रक्षेताम् | ते रक्षेयु | ■ लभेत | तौ लभेयाताम् | ते लभेरन् |

वरील रूपाचें पृथक्करण केल्यास पुढील प्रत्यय दिसून येताल

| प. प. | | | आ. प. | | |
|---|---|---|---|---|---|
| ईयम् | ईव | ईम | ईय | ईवहि | ईमहि |
| ई | ईतम् | ईत | ईथा | ईयाथाम् | ईध्वम् |
| ईत् | ईताम् | ईयु | ईत | ईयाताम् | ईरन् |

विध्यर्थी रूपें सामान्य नियमाप्रमाणें बनविलेलीं आहेत.

मूळधातु ( अथवा विकार ) + विकरण + प्रत्यय.

चतुर्थ, षष्ठ व दशम गणाच्या धातूंची दोन्ही पदामध्यें विध्यर्थी रूपें वरील पद्धतीनें करता येतील. जसें —

| | प. प. | आ. प. |
|---|---|---|
| च. ग. | नश् – नश् + य + ईत् – नश्येत्। | जन् – जा + य + ईत – जायेत। |
| ष. ग. | सिच् – सिञ्च् + अ + ईयम् – सिञ्चेयम्। | विद् – विन्द् + अ + ईय – विन्देय। |
| द. ग. | प्री – प्रीण् + अय + ई – प्रीणये । | मन्त्र – मन्त्र् + अय + ईथा – मन्त्रयेथा। |

३ (१) जनाः सुखं विन्देरन्। (२) युष्माकं सङ्कटानि नश्येयुः।
(३) अपि नाम शिशुः जीवेत्। (४) सर्वत्र सुभिक्षं भवेत् इति साधुः अवदत्।

वरील पहिल्या वाक्यात आशा अपेक्षा, दुसऱ्यात-इच्छा, तिसऱ्यात अपेक्षा, व चवथ्यात आशीर्वाद-शुभेच्छा विध्यर्थी रूपानीं दर्शविलेली आहे.

४ यदि त्वम् मम गृहं आगच्छेः तर्हि अहं त्वां मम पुस्तकालयं दर्शयेयम्।

यदि सुग्रीवस्य साहाय्यं वयं लभेमहि तर्हि शोभनं भवेत् इति मारुतिः रामम् अवदत्।

वरील वाक्यात एकमेकावर अवलंबून असणारी वाक्यें योजलेली आहेत व त्या वाक्यात भविष्यकाळाचा अर्थ विध्यर्थी रूपानीं दर्शविलेला आहे.

५ नृपः प्रजानां दुःखानि हरेत्। नृपेण प्रजानां दुःखानि ह्रियेरन्।
भृत्याः भारं वहेयुः। भृत्यैः भारः उह्येत।
पश्चात्तापः पापानि क्षालयेत्। पश्चात्तापेन पापानि क्षाल्येरन्।
सैनिकाः राजधानीं परितः तिष्ठेयुः। सैनिकैः राजधानीं परितः स्थीयेत।

**पर्जन्यः काले पतेत् । पर्जन्येन काले पत्येत ।**

वरील वाक्यें कर्तरि व कर्मणि–भावे अशा दोन्ही प्रयोगांत लिहिलेलीं आहेत व त्यांची रचना पूर्वीच्या नियमांना अनुसरूनच झालेली आहे

क्षाल्येरन् – ( क्षल् ) क्षाल + य + ईरन् । ह्रियेरन् – ( हृ ) ह्रि + य + ईरन् ।
उह्येत – ( वह् ) उह् + य + ईत । स्थायेत – ( स्था ) स्थी + य + ईत ।
पत्येत – पत् + य + ईत ।

वरील रूपांच्या पृथक्करणावरून हें ध्यानात येईल कीं विध्यर्थी कर्मणि रूपें इतर काळांच्या कर्मणि रूपांप्रमाणेंच तयार केलेलीं आहेत —मूळ धातु ( य पूर्वी होणारा विकार ) + य + आ. प विध्यर्थी प्रत्यय

६ अस् ( २ ग प प )
स्याम् स्याव स्याम । स्याः स्यातम् स्यात । स्यात् स्याताम् स्युः ।

कृ ( ८ ग प प. )
कुर्याम् कुर्याव कुर्याम । कुर्याः कुर्यातम् कुर्यात । कुर्यात् कुर्याताम् कुर्युः ।

ज्ञा ( ९ ग प प )
जानीयाम् जानीयाव जानीयाम । जानीयाः जानीयातम् जानीयात । जानीयात् जानीयाताम् जानीयुः ।

ग्रह् ( ९ ग. प प )
गृह्णीयाम् गृह्णीयाव गृह्णीयाम । गृह्णीयाः गृह्णीयातम् गृह्णीयात । गृह्णीयात् गृह्णीयाताम् गृह्णीयुः ।

श्रु ( ५ ग प प )
शृणुयाम् शृणुयाव शृणुयाम । शृणुयाः शृणुयातम् शृणुयात । शृणुयात् शृणुयाताम् शृणुयुः ।

---

**प्रश्न**

१ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंचीं विध्यर्थी रूपें योजा —
१ नराः कालं सदाचारेण ( नी ) ।
२ याचकेभ्यः धनिकाः धनं ( दा ) ।
३ क शरणं ( गम् ) इति सङ्कटे पतिताः नराः अचिन्तयन् ।

४ प्रजा सुख ( अनु + भू ) इति नृपस्य इच्छा ।
५ मृगतृष्णिकासु नर कदापि जल न ( लभ् ) ।
६ यदि त्व मम उपदेश ( श्रु ) तर्हि तव सङ्कटानि ( नश् ) ।
७ नर प्राणव्ययेन अपि मित्रस्य प्राणान् ( रक्ष्—णि )
८ ना कायेन चित्तेन वचनेन वा परस्य अहित न ( कृ ) ।
९ कातर युद्धे शत्रूणा पुरत न ( स्था ) अपि तु ( परा+अय् ) ।
१० एष मम मित्र ( भू ) इति मे तर्ष ।

२ पुढील रूपें ओळखून दिलेल्या वाक्यात योग्य जागी त्याचा उपयोग करा —
आयेत, अवसादेत, पृच्छेयम्, विजयेया , त्यजेत् ।

१ नर ग्रामार्थे कुल ------ इति सुभाषितम् ।
२ कलह बुनेषु न इति जनकेन धनविभागा कृता ।
३ आलस्येन नर अत उद्योग कर्तव्य ।
४ क मार्ग —— - इति मार्गात् भ्रष्ट बाल अचिन्तयत् ।
५ त्व परक्षाया इति जनक अवदत् ।

३ अनुरुध्येयु , स्पृहयेम, समृध्येत्, कथैरन्, कल्पेत या विध्यर्थी रूपांचा संस्कृत वाक्यात उपयोग करा

टीप —मृगतृष्णिका-मृगजळ प्राणव्यय प्राण खर्ची घालणें

---

# पाठ २१—व्यंजनान्त नामें व विशेषणें.

---

१ त्, द्, च्, ज् हीं अन्त्य व्यंजनें असणारे शब्दः—
कुबेरस्य सम्पद् ( संपत्ति ) अवर्णनीया । सम्पदः ( संपत्तीच्या ) लाभेन नरं सर्वे गुणाः आश्रयन्ते । लोकोत्तराणां चित्तं सम्पत्सु ( भरभराटीच्या वेळीं ) उत्पलम् इव कोमलं भवति । सम्पद्भिः ( संपत्तीनें ) सत्पुरुषाः उद्धताः न भवन्ति । यतयः येद्दियां सम्पदं

( सपत्तीला ) तृणाय मन्यन्ते । सज्जना. परस्य सम्पद्भ्यः ( सपत्ती-साठीं ) न स्पृहयन्ति ।

वरील वाक्यांत **सम्पद्** या दकारान्त स्त्रीलिंगी नामाचीं निरनिराळ्या विभक्तींचीं रूपें योजलेलीं आहेत तकारान्त व दकारान्त पुल्लिंगी व स्त्रीलिंगी नामें एकाच तऱ्हेनें चालतात

सम्पद् ( स्त्री )

सम्पद् सम्पदौ सम्पदः प्र. सम्पदः सम्पद्भ्याम् सम्पद्भ्यः पं.
सम्पदम् ,, सम्पदः द्वि. ,, सम्पदोः सम्पदाम् ष.
सम्पदा सम्पद्भ्याम् सम्पद्भिः तृ. सम्पदि ,, सम्पत्सु स.
सम्पदे ,, सम्पद्भ्यः च. हे सम्पद् हे सम्पदौ हे सम्पदः सं.

व्यञ्जनान्त नामाचीं पु व स्त्री. रूपें करताना पुढील प्रत्यय सामान्यतः जोडले जातात.

स् औ अस् प्र ए भ्याम् भ्यस् च. इ ओस् सु स.
अम् ,, अस् द्वि अस् ,, ,, पं. – औ अस् सं.
आ भ्याम् भिस् तृ. ,, ओस् आम् ष.

वरील प्रत्ययांचे तीन विभाग पडतात —

( १ ) प्रथमा द्वि , ब व , द्वितीया ए व , द्वि. आणि सम्बोधन द्वि , ब. व

( २ ) द्वितीया ब व व इतर विभक्त्यांचे स्वरारंभी प्रत्यय

( ३ ) व्यञ्जनारंभी प्रत्यय

टीप —व्यञ्जनान्त शब्दाच्या प्रथमा-एकवचनाचा प्रत्यय टाकला म्हणजे पहिलें व्यञ्जन शिल्लक ठेऊन बाकीच्याचा लोप करतात

४२ नियमः—कोणत्याहि पदाच्या शेवटीं अनुनासिकाशिवाय इतर वर्ग-व्यञ्जन आलें तर त्याबद्दल त्याच वर्गाचें प्रथम किंवा तृतीय अक्षर होतें

' सम्पद् ' प्रमाणें चालणारीं तकारान्त व दकारान्त नामें

पु०—भूभृत्—राजा, पर्वत, मरुत्—देवाचें नाव, वारा, सुहृद्—मित्र

स्त्री०—आपद्-विपद्—विपत्ति, संकट, दृषद्—दगड, प्रतिपद्—पंधरवड्याचा पहिला दिवस, मृद्—माती, विद्युत्—वीज, शरद्—शरद् ऋतु, सम्पद्—सम्पत्ति, सरित्—नदी

## २ नपुसकलिंगी तकारान्त नामें —

**जगत्**—जग प्र द्वि स—जगत् जगती जगन्ति इतर विभक्तीची रूपे 'सम्पद्' प्रमाणें होतात

तकारान्त नपुसकलिंगी नाम—**वियत्** आकाश

नपुसकलिंगी व्यजनान्त नामाचे प्रथमा द्वितीया व सम्बोधनाचे प्रत्यय —

— ई इ बहुवचनाचे इ या प्रत्ययापूर्वी मूळ शब्दातील अन्त्य व्यजनापूर्वी अनुनासिक यत

## ३ तकारान्त विशेषणें —

**हरित्**—हिरवा **पुण्यकृत्**—पुण्य करणारा **देहभृत्**—देह धारण करणारा व इतर कृत्, भृत् असा अन्त्य भाग असणारी

ही विशेषणें पुल्लिंगामध्ये व स्त्रीलिंगामध्यें सम्पद प्रमाण चालतात व नपुसकलिंगामध्ये जगत् प्रमाण चालतात

## ४ चकारान्त व जकारान्त नामें व विशेषणें —

**लौकिकाना साधूना वाक् ( वाणी ) अर्थम् अनुसरति । आद्यानाम् ऋषीणा वाचम् ( शब्दाना ) अर्थ अनुवर्तते । चित्ते वाचि ( वाणी**ध्यात **क्रियाया च साधूनाम् एकरूपता । वचय वाचाम् ( शब्दाचे ) अधिपतय सन्ति । अनृताभ्य वाग्भ्य ( खोट्यापासून ) सङ्कटानि उद्भवन्ति । साधव वाचा ( शब्दानी ) न कमपि पीडयन्ति ।**

वराल वाक्यात 'वाच' शब्दाची निरनिराळ्या विभक्तीची रूपें योजली आहेत

वाच् ( वा )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वाक | वाचौ | वाच | प्र | वाच | वाग्भ्याम् | वाग्भ्य | प |
| वाचम् | | | द्वि | | वाचो | वाचाम् | ष |
| वाचा | वाग्भ्याम् | वाग्भि | तृ | वाचि | | वाक्षु | स |
| वाचे | | वाग्भ्य | च | वाक् | वाचौ | वाच | स |

**नियम** —च् किंवा ज् याचा प्रत्ययाच्या कठोर व्यंजनापूर्वी क् होतो व मृदु व्यंजनापूर्वी ग् होतो

**वाच्** सारखा चालणारीं नामें —**वाच्**—स्त्री वाणी, शब्द, **वणिज्**—पु व्यापारी, **हुतभुज्**—पु अग्नि, **भिषज्**—पु वैद्य

विशेषणें —**सुखभाज्**—सुखी, **आत्मभाज्-देहभाज्**—आत्मा किंवा देह धारण करणारा, **दुःखभाज्**—दुःखी

हीं विशेषणें पुल्लिंगामध्यें व स्त्रीलिंगामध्यें 'वाच' प्रमाणें चालवावीं व नपुसकलिंगामध्यें तृतीया ते सप्तमीपर्यंत पुल्लिंगाप्रमाणें चालवावीं.

प्र द्वि स —सुखभाक् सुखभाजी सुखभाञ्जि

## ५ वत्-मत् प्रत्ययान्त विशेषणें:—

**धनवतां नराणां पुत्रात् अपि भयं विद्यते। विद्यावद्भिः पुरुषैः प्राप्तुम् अशक्यं वस्तु नास्ति। गुणवत्सु सुतेषु कुटुम्बभारं निक्षिप्य नराः वनम् आश्रयन्ति। धीमद्भ्यः नरेभ्यः धीमतीभ्यः नारीभ्यः च धीमन्तः धनं लभन्ते। विनयवत्यः नार्यः भर्तुः प्रतीपं न गच्छन्ति। वसन्ते पुष्पवतां वृक्षाणां पुष्पवतीनां लतानां च बाहुल्येन वनानि पुष्पवन्ति दृश्यन्ते।**

वरील वाक्यांत 'वत् आणि मत्' हे स्वत्वदर्शक प्रत्यय लावून झालेलीं विशेषणें योजलेलीं आहेत.

### गुणवत् ( पु )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| गुणवान् | गुणवन्तौ | गुणवन्तः | प्र. | गुणवतः | गुणवद्भ्याम् | गुणवद्भ्यः | पं. |
| गुणवन्तम् | ,, | गुणवतः | द्वि. | ,, | गुणवतोः | गुणवताम् | ष. |
| गुणवता | गुणवद्भ्याम् | गुणवद्भिः | तृ. | गुणवति | ,, | गुणवत्सु | स. |
| गुणवते | ,, | गुणवद्भ्यः | च. | हे गुणवन् | हे गुणवन्तौ | हे गुणवन्तः | सं. |

### गुणवत् ( न. ) जगत्प्रमाणें प्र द्वि स

प्र द्वि स —गुणवत् गुणवती गुणवन्ति. इतर विभक्ति पुल्लिंगाप्रमाणें.

### गुणवत् ( स्त्री )—दीर्घ ई जोडून नदीप्रमाणें.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| गुणवती | गुणवत्यौ | गुणवत्यः | प्र. | गुणवत्याः | गुणवतीभ्याम् | गुणवतीभ्यः | पं. |
| गुणवतीम् | ,, | गुणवतीः | द्वि. | ,, | गुणवत्योः | गुणवतीनाम् | ष. |
| गुणवत्या | गुणवतीभ्याम् | गुणवतीभिः | तृ. | गुणवत्याम् | ,, | गुणवतीषु | स. |
| गुणवत्यै | ,, | गुणवतीभ्यः | च. | गुणवति | गुणवत्यौ | गुणवत्यः | सं. |

**गुणवत्** सारखीं काहीं विशेषणें —कान्तिमत्, गुणवत्, धनवत्, धीमत्, परवत्, बुद्धिमत्, बलवत्, भगवत्, विद्यावत्, श्रीमत् या शब्दाचा अर्थ ज्या नामाला 'वत् व मत्' हे प्रत्यय लावले असतील त्यानें युक्त असा होतो. जसें कान्तिमत्—कान्तियुक्त, धनवत्—धनयुक्त.

६ **'भवत्'** हें सर्वनाम बहुमानार्थी **'आपण'** या अर्थी व **'कियत्'** हें विशेषण **'किती'** या अर्थी—हे शब्द वरील 'गुणवत्' या विशेषणाप्रमाणें चालवावे. 'भवत्' हें सर्वनाम अर्थानें जरी द्वितीय-पुरुषवाचक असलें तरी त्याचा उपयोग तृतीयपुरुषी क्रियापदाबरोबर करतात. जसें—भवान् कं उपविशतु। हें 'भवत्' सर्वनाम 'अत्र व तत्र' यांना जोडून योजलें असता आदरदर्शक भाव दर्शविला जातो 'अत्रभवान्' हें समोर हजर असलेल्या मनुष्याबद्दल बोलतांना वापरतात आणि 'तत्रभवान्' हे हजर नसलेल्या मनुष्याबद्दल बोलतांना वापरतात.

७ **महान् महत्सु एव पराक्रमं करोति ।** मोठा मनुष्य मोठ्या माणसाच्या ठिकाणीच पराक्रम गाजवतो.

**महतां चरित्रम् आह्लादकं भवति ।** मोठ्या मनुष्याचें चरित्र आनन्ददायक असतें.

**महतां नराणां महत्या बुद्ध्या महान्ति कार्याणि सिध्यन्ति ।** मोठ्या लोकांच्या मोठ्या बुद्धीनें मोठीं कामें यशस्वी होतात.

वरील वाक्यांत 'महत्' या विशेषणाचीं रूपें योजलेलीं आहेत. पुल्लिंगामध्यें प्र., द्वि. व सं. शिवाय इतर रूपें 'सम्पद्' प्रमाणें होतात स्त्रीलिंगामध्यें दीर्घ 'ई' जोडून 'नदी' प्रमाणें व नपुसकलिंगी प्र., द्वि. व सं. शिवाय पुल्लिंगाप्रमाणें होतात.

पुं०:—प्र. महान् महान्तौ महान्तः । द्वि. महान्तम् महान्तौ महतः
        सं. महन् ,, ,, इतर 'सम्पद्' प्रमाणें.

स्त्री०:—महत् + ई = महती—नदीप्रमाणें.

न०:—प्र. द्वि. सं.—महत् महती महान्ति । इतर पुल्लिंगाप्रमाणें.

**'बृहत्'** (आकारानें मोठा) हें विशेषण 'गुणवत्' प्रमाणें चालवावें. मात्र पु. प्रथमेचें एकवचन 'बृहन्' असें होतें.

## नवीन शब्द

( अ ) आहुति. ( स्त्री. ), निरोध , इन्द्रियम्.

( आ ) अनृतम्—खोटें बोलणें

अविषयः—अयोग्य विषय

असंयमः—ताबा नसणें, स्वैरता

आद्य ( वि )—पहिला

उत्पलम्—कमळ

उद्धत ( वि )—उद्धट, गर्विष्ठ

कुबेरः—संपत्तीच्या देवाचें नाव

ऐहिक ( वि. स्त्री.-ऐहिकी )—या जगातील

देशान्तरम्—दुसरा देश

लौकिक—( वि स्त्री.-लौकिकी )—या लोकांतील, सामान्य

लोकोत्तर ( वि. )—सर्व लोकांत श्रेष्ठ

वि + लस् ( १ प प. )—प्रकाशणें

संसर्गः—संगति

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील शब्दांची योग्य रूपें योजा —

१ वानराः राक्षसान् ( दृषद् ) अताडयन् ।
२ ( आपद् ) मित्रत्वं परीक्ष्यते ।
३ ( मृद् ) मय प्रतिबिम्बं न गृह्णाति ।
४ ( भूभृत् ) न विचलन्ति ( मरुत् ) वेगेन ।
५ ईश्वरस्य वर्णनं ( वाच् ) अशक्यम् ।
६ ( त्विष् ) विलसति तडित् ।
७ दुर्बलेन ( बलवत् ) विरोधः न कर्तव्यः ।
८ ( हुतभुज् ) आहुतयः देवान् प्रति नीयन्ते ।
९ ( भिषज् ) औषधानि यच्छन्ति ।
१० ( महत् ) संसर्गः ( महत् ) फलाय कल्पते ।

२ पुढील रूपें ओळखून दिलेल्या वाक्यांत योग्य जागीं योजा —

आपदाम् , हरन्ति, दुःखभाजाम् , आयुष्मत , धीमता, वणिज , मरुद्भ्य , भगवता, प्रतिपद , बुद्धिमत्सु ।

१ ——— न कश्चित् अविषय ।
२ ——— देशान्तर गच्छति ।
३ ——— मथित मार्ग इन्द्रियाणाम् असयम ।
४ वृक्षाणा पर्णानि ——— शरन्ते ।
५ सर्व जना ——— पुत्रान् वाञ्छन्ति ।
६ ——— वर यच्छति मुनि ।
७ ——— आरभ्य चन्द्रस्य बिम्ब वर्धते ।
८ ——— वाल्मीकिना सीता रक्षिता ।
९ एतस्मिन् जगति ——— वाहुल्य वर्तते ।
१० ——— प्राणिषु नरा श्रेष्ठा ।

३ सन्धि करा —वृक्षात् अपतत् बदरीफलम् । आपद् मित्र परीक्षते । सुतभाक् नर अयच्छत् धनम् ।

४ सन्धि सोडवून लिहा —उद्यानाद्बहिर्वापी वर्तते । स्वर्गादवातरमारद । अकस्मान्मामपश्यद्वनिक ।

# पाठ २२–नकारान्त नामें व विशेषणें.

१ पृथिव्यां बहवः राजानः ( राजे ) सन्ति । राजानमन्तरेण ( राजा-वाचून ) प्रजानां रक्षणम् अशक्यम् । राजभिः ( राजांकडून ) शत्रवः जीयन्ते । अतः राज्ञि-राजनि ( राजाच्या ठिकाणी ) तासाम् आदरः । राज्ञः ( राजाच्या ) सभाः पण्डिताः अलङ्कुर्वन्ति । राज्ञः ( राजा-पासून ) प्रसादम् अपेक्षन्ते कवयः । राज्ञे ( राजाला ) आशीर्वादं प्रयच्छन्ति ते ।

वरील वाक्यात ' राजन् ' या पु नकारान्त नामाचीं रूपें योजलेलीं आहेत नकारान्त सर्रिखी नामेंहि पुढिलप्रमाणेंच चालतात.

### राजन् ( पु. )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| राजा | राजानौ | राजानः | प्र. | राज्ञः | राजभ्याम् | राजभ्यः | पं. |
| राजानम् | ,, | राज्ञः * | द्वि. | राज्ञः | राज्ञोः | राज्ञाम् | ष. |
| राज्ञा | राजभ्याम् | राजभिः | तृ. | राज्ञि राजनि | ,, | राजसु | स. |
| राज्ञे | ,, | राजभ्यः | च. | हे राजन् | हे राजानौ | हे राजानः | सं. |

* राजन् यातील उपान्त्य ' अ 'चा स्वरादी प्रत्ययापूर्वी लोप झाला आहे

राजन्+अस्–राज् न्+अस्–राज् ञ्+अस्–राज्ञ्+अस्–राज्ञः

**राजन्** प्रमाणें पुढील नामें चालवावीं.

**ग्रावन्**—पु. दगड, **प्रेमन्**—पु. प्रेम, **महिमन्**—पु. मोठेपणा, **मूर्धन्**—पुं. डोकें, **लघिमन्**—पुं. लहानपणा, **सीमन्**—स्त्री. मर्यादा.

२ **आत्मन्**—(पु.) आत्मा, **अन्तरात्मन्**—पु अन्तरात्मा, **अश्मन्**—पुं. दगड, **विश्वकर्मन्**—पुं. देवांचा कारागीर, **ब्रह्मन्**—पु. ब्रह्मदेव, ब्राह्मण, हे शब्दहि 'राजन्' प्रमाणें चालवावे. मात्र द्वितीया बहुवचनापासून स्वरादी प्रत्ययापूर्वी उपान्त्य 'अ' चा लोप करूं नये, कारण या नामामध्यें उपान्त्य 'अ' पूर्वी 'म् अथवा व्'नें युक्त असें संयुक्त व्यंजन आहे.

### आत्मन् ( पु. )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| आत्मा | आत्मानौ | आत्मानः | प्र. | आत्मनः | आत्मभ्याम् | आत्मभ्यः | पं. |
| आत्मानम् | ,, | आत्मनः | द्वि. | ,, | आत्मनोः | आत्मनाम् | ष. |
| आत्मना | आत्मभ्याम् | आत्मभिः | तृ. | आत्मनि | ,, | आत्मसु | स. |
| आत्मने | ,, | आत्मभ्यः | च. | हे आत्मन् | हे आत्मानौ | हे आत्मानः | सं. |

३ दशरथस्य पुत्राणां नामानि रामः लक्ष्मणः भरतः शत्रुघ्नः च ।
,, भार्यायाः नाम कौसल्या ।
रामस्य पुत्रयोः नामनी कुशः लवः च ।
मोक्षस्य त्रीणि वर्त्मानि सन्ति ज्ञानं कर्म भक्तिः च ।
एतेषां द्वे वर्त्मनी दुष्करे । एकं वर्त्म सुकरम् ।

वरील वाक्यांत नामन् व वर्त्मन् या नकारान्त नपुंसकलिंगी नामांचीं प्रथमेचीं रूपें योजलेलीं आहेत.

**नामन्** ( उपान्त्य अ पूर्वी एकेरी व्यंजन असलेलें. )

**नामन्**—( न. ) नाम नामनी–नाम्नी नामानि **प्र. द्वि.**

हे नामन्–नाम ,, ,, ,, **सं.**

इतर विभक्तींचीं रूपें ' राजन् ' प्रमाणें.

नामन् सारखे चालणारे शब्द —**प्रेमन्**–( न. ) प्रेम, **हेमन्**–( न. ) सोनें.

४ **वर्मन्** ( उपान्त्य अ पूर्वी म् किंवा व् नें युक्त असें संयुक्त व्यंजन असलेलें )

वर्म वर्मणी वर्माणि प्र. द्वि. } इतर आत्मन् प्रमाणें.
हे वर्मन् वर्म हे ,, हे ,, सं.

**वर्मन्** सारखीं न. नामें —

**कर्मन्**—कर्म कृत्य, **चर्मन्**—चामडें, **जन्मन्**—जन्म, **भस्मन्**—राख, **मर्मन्**—शरीराचा नाजुक भाग, **घर्मन्**—चिलखत, **सद्मन्**—घर.

५ **' इन्-विन् ' प्रत्ययान्त नामें-विशेषणें:—**

**भाविनम् अनर्थं ज्ञातुम् असमर्थः एव मनुष्यः। भाविन्याः कीर्तेः कृते शूराः मृत्युम् अपि न गणयन्ति। दुश्चिह्नानि भावीनि सङ्कटानि सूचयन्ति।**

वरील वाक्यांत **' भाविन् '** ( पुढें घडणारा ) हें विशेषण तीन्ही लिंगांत योजलेलें आहे.

भाविन् ( पु. )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| भावी | भाविनौ | भाविनः | **प्र.** | भाविनः | भाविभ्याम् | भाविभ्यः | **पं.** |
| भाविनम् | ,, | ,, | **द्वि.** | ,, | भाविनोः | भाविनाम् | **ष.** |
| भाविना | भाविभ्याम् | भाविभिः | **तृ.** | भाविनि | ,, | भाविषु | **स.** |
| भाविने | ,, | भाविभ्यः | **च.** | हे भाविन् | हे भाविनौ | हे भाविनः | **सं.** |

**भाविन्** ( न )—तृतीया ते सप्तमीपर्यंत पुल्लिंगाप्रमाणें.

भावि भाविनी भावीनि प्र. द्वि., भाविन्-वि भाविनी भावीनि सं.

**भाविन्** ( स्त्री. )–भाविन्+ई–भाविनी–नदीप्रमाणें.

**' इन् '** अवयवान्त पुढील शब्द बहुधा पुंल्लिंगामध्यें चालतात.

**अनुजीविन्**—नोकर, **कञ्चुकिन्**—अन्तःपुरांतील सेवक, **पक्षिन्**—पक्षी,

प्राणिन्—प्राणी, शशिन्—चन्द्र, शिखरिन्—पर्वत शूलिन्—शंकर स्वामिन्—धनी परंतु त्यास ई जोडून स्त्रीलिंगामध्येंहि चालवता येतील

'इन्-विन्' प्रत्ययान्त काहीं विशेषणें —अपराधिन्—अपराध करणारा धनिन्—श्रीमान्, कुशलिन्—कुशल असणारा क्षयिन्—कमी होणारा बलिन्—बलवान्, मेधाविन्—बुद्धिमान हीं विशेषणें मानिन् प्रमाणें तीन्ही लिंगात चालवता येताल

६ पञ्चन् ते नवदशन् (संख्याविशेषणें) —

हीं संख्याविशेषणें बहुवचनातच चालविलीं पाहिजेत हें अवश्य ध्यानात येईल पञ्च वृक्षाः । पञ्च लताः । पञ्च पुष्पाणि । हीं संख्याविशेषणें तीन्ही लिंगामध्यें एकाच तऱ्हेनें चालतात

| | पञ्चन् | षष् | अष्टन् |
|---|---|---|---|
| प्र. द्वि. सं. | पञ्च | षट्—ड् | अष्ट—अष्टौ |
| तृ. | पञ्चभि | षड्भि | अष्टभि —अष्टाभि |
| च. पं. | पञ्चभ्य | षड्भ्य | अष्टभ्य —अष्टाभ्य |
| ष. | पञ्चानाम् | षण्णाम् | अष्टानाम् |
| स. | पञ्चसु | षट्सु—षट्‌सु | अष्टसु—अष्टासु |

सप्तन्, नवन्, दशन्, एकादशन्, द्वादशन्, त्रयोदशन्, चतुर्दशन्, पञ्चदशन्, षोडशन्, सप्तदशन्, अष्टादशन् व नवदशन् 'पञ्चन्' प्रमाणें चालवावीं

## नवीन शब्द

(अ) उत्सव, रचना
दुश्चिह्नम्—वाईट चिह्न

(आ) अङ्क —डाग
अनर्थ —संकट
अव+लम्ब् (१ आ प)—अवलंबून असणे
प्रसाद —कृपा
विभूति (स्त्री)—ऐश्वर्य
हनुमत्—(पु) मारुति

## प्रश्न

१ कंसातील शब्दांची योग्य रूपें योजा —

१ साधव (प्रेमन्) जगत् जयन्ति ।

२ (ब्रह्मन्) चत्वारि मुखानि ।

३ हनुमान् (ग्रावन्) राक्षसान् प्राहरत् ।

४ (राजन्) कीर्ति कवय गायन्ति ।

५ नरस्य (महिमन्) (लघिमन्) वा गुणान् एव अवलम्बते ।

६ महद्भि सुप्रतिष्ठित (अश्मन्) अपि देवत्व गच्छति ।

७ (शशिन्) किरणेषु अङ्क निमज्जति ।

८ (मेधाविन्) छात्रे गुरु स्निह्यति ।

९ (पक्षिन्) पन्थम् आकाश ।

१० (अपराधिन्) दण्डयति नृप ।

२ पुढील रूपें ओळखून दिलेल्या वाक्यांत योजा —योगिनाम्, धर्म, महात्मनाम्, विश्वकर्मण, गाविन, मर्मनाम्, सामान, स्वामिन, अनुगामिन, चर्मणा ।

१ —— अनर्थान् नर न जानाति ।

२ मोक्षस्य त्रयाणाम् —— भक्तिमार्ग अतीव सुन्दर ।

३ कलियुगे शरीरिणा —— धर्म ।

४ —— जन्मन उत्सव क्रियते ।

५ भूगे रचनाया —— चातुर्यं दृश्यते ।

६ रजक रासभ व्याघ्रस्य —— आच्छादयन् ।

७ —— —— प्रभुम् अनुसरन्ति ।

८ महता विपुलाना —— न सन्ति ।

९ —— मूर्त्येभ्य पारितोषिकाणि यच्छन्ति ।

१० श्रीकृष्ण —— —— श्रेष्ठ आसीत् ।

३ प्रश्न १ व २ यामधील पाच पाच वाक्यें सन्धि करून लिहा.

# पाठ २३—सकारान्त नामें—विशेषणें.

१ चन्द्रमसः (चन्द्राच्या) प्रकाशेन धवलं भवति भूतलम्। चन्द्रमसा (चन्द्रानें) शोभते आकाशः यथा तडागः पद्मेन। चन्द्रमसि (चन्द्राच्या ठिकाणी) वैरं राहोः। चन्द्रमाः (चन्द्र) शुणप्रकर्षात् तिष्ठति शङ्करस्य मौलौ। पूर्णिमायां चन्द्रमसं (चन्द्राला) दृष्ट्वा प्रमुदिताः भवन्ति जनाः। हे चन्द्रमः (चन्द्रा) महत् ते भाग्यम्।

वरील वाक्यांत 'चन्द्रमस्' या पु सकारान्त नामाचीं रूपें योजलेलीं आहेत त्याचीं सर्व रूपें पुढीलप्रमाणें होतात.

चन्द्रमस् (पु)

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| चन्द्रमाः | चन्द्रमसौ | चन्द्रमसः | प्र. | चन्द्रमसः | चन्द्रमोभ्याम् | चन्द्रमोभ्यः | पं. |
| चन्द्रमसम् | ,, | ,, | द्वि. | ,, | चन्द्रमसोः | चन्द्रमसाम् | ष. |
| चन्द्रमसा | चन्द्रमोभ्याम् | चन्द्रमोभिः | तृ. | चन्द्रमसि | ,, | चन्द्रमःसु | स. |
| चन्द्रमसे | ,, | चन्द्रमोभ्यः | च. | हे चन्द्रमः | हे चन्द्रमसौ | हे चन्द्रमसः | सं. |

'चन्द्रमस्' प्रमाणें चालणारे शब्द—**नामें.**

जातवेदस् (पु)—अग्नि दुर्वासस् (पु)—ऋषीचें नाव, वेधस् (पु) ब्रह्मदेव

विशेषणें —**दिवौकस्**—स्वर्गांत राहाणारा, **प्रवयस्**—वयोवृद्ध, म्हातारा **महौजस्**—पराक्रमी, **वनौकस्**—वनात राहाणारा.

हीं विशेषणें पुल्लिंगामध्यें व स्त्रीलिंगामध्यें 'चन्द्रमस्' प्रमाणें चालतात नपुसकलिंगामध्यें 'मनस्' प्रमाणें चालवावी.

२ मनस्—मन नपुसकलिंगी

**मनः मनसी मनांसि** प्र द्वि स इतर विभक्ति 'चन्द्रमस्' प्रमाणें

मनस प्रमाणें चालणारीं नपुसकलिंगी नामें —

(अ) तपस्, तेजस्, यशस्, वयस्, वयस्

(आ) छन्दस्—वेद, तमस्—काळोख, नभस्—आकाश, पयस्—पाणी, रक्षस्—राक्षस रजस्—धूळ, वक्षस्—छाती, वचस्—बोलणें वासस्—वस्त्र शिरस्—डोकें, सरस्—तळें

हविस्—हविर्भाग, आहुति ( न )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| हवि | हविषी | हवींषि | प्र. | हविष | हविर्भ्याम् | हविर्भ्य | पं |
| „ | „ | „ | द्वि. | हविष | हविषो | हविषाम् | ष |
| हविषा | हविर्भ्याम् | हविर्भि | तृ. | हविषि | „ | हविःषु | स |
| हविषे | „ | हविर्भ्यं | च. | हवि | हविषी | हवींषि | सं |

चक्षुस्—न डोळा, धनुस्—न धनुष्य हे हविस् प्रमाणें चालवावे

अर्चिस्—स्त्री ज्वाळा हा शब्द व्यजनान्त नामाचे प्रत्यय लाऊन चालवावा

अर्चिस् ( स्त्री )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अर्चि | अर्चिषी | अर्चिष | प्र | अर्चिष | अर्चिर्भ्याम् | अर्चिर्भ्य | पं |
| अर्चिषम् | „ | „ | द्वि. | „ | अर्चिषो | अर्चिषाम् | ष |
| अर्चिषा | अर्चिर्भ्याम् | अर्चिर्भि | तृ. | अर्चिषि | „ | अर्चिःषु | स |
| अर्चिषे | „ | अर्चिर्भ्य | च. | अर्चि | अर्चिषी | अर्चिष | सं |

३ भक्तिमार्गः ज्ञानमार्गात् श्रेयान् ( ज्यास्त चांगला )।

लक्ष्मण. ज्यायांसं भ्रातरं वने अन्वसरत् ( वडील भावाला )।

मनोरथस्य सिद्धये नराः भूयस प्रयत्नान् ( पुष्कळ यत्न ) कुर्वन्ति।

वरील वाक्यात श्रेयस्, ज्यायस्, भूयस् ही तुलनात्मक विशेषणें योजलेली आहेत दोन वस्तूंचा अथवा मनुष्याची तुलना करतांना ज्याच्याहून ज्यास्त त्या शब्दाची पंचमी विभक्ति योजतात. अशा प्रकारच्या शब्दाची रुपें 'श्रेयस्' च्या रुपाप्रमाणें होतात

श्रेयस् ( पु )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| श्रेयान् | श्रेयांसौ | श्रेयांस | प्र. | श्रेयस | श्रेयोभ्याम् | श्रेयोभ्य | प |
| श्रेयांसम् | „ | श्रेयस | द्वि. | „ | श्रेयसो | श्रेयसाम् | [illegible] |
| श्रेयसा | श्रेयोभ्याम् | श्रेयोभि | तृ. | श्रेयसि | „ | श्रेयस्सु | स |
| श्रेयसे | „ | श्रेयोभ्य | च. | श्रेयन् | श्रेयांसौ | श्रेयांस | सं |

श्रेयस् नपुंसकलिंगामध्यें मनस्प्रमाणें चालवावा.

,, स्त्रीलिंगामध्यें दीर्घ ई जोडून नदीप्रमाणें चालवावा.

*या प्रकारचे काहीं शब्द.—*

**कनीयस्**–वयानें लहान; **ज्यायस्**–वयानें किंवा महत्त्वानें ज्यास्त; **प्रेयस्**–ज्यास्त प्रिय; **भूयस्**–ज्यास्त ( संख्येनें किंवा परिमाणानें ), **श्रेयस्**–ज्यास्त चांगला.

## नवीन शब्द

| | |
|---|---|
| अप+ऊह् ( १ प. प. अपोहति)–नाश करणें | मौलिः (पुं स्त्री.)–डोकें |
| आ+नन्द् प्र. (आनन्दय)–आनन्दित करणें | वाल्मीकिः (पु.)–ऋषीचें नाव |
| जनस्थानम्–दण्डकारण्याचा एक भाग | शप् (१ प. प.)–शाप देणें |
| निषूदित (धा. वि.)–मारला गेलेला | संहतिः (स्त्री.)–एकी |
| पादाघातः–पायाचा तडाखा | सहस्रम्–हजार |
| | स्तम्भः–खांब, ओट |

---

### प्रश्न

२ कंसातील शब्दांच्या योग्य रूपांनीं पुढील वाक्यें पुरीं करा —

१ ( चन्द्रमस् ) शोभते निशा निशया च शोभते ( चन्द्रमस् ) ।

२ इन्द्रः ( दिवौकस् ) अधिपति ।

३ ( अवयस् ) नरस्य अङ्गानि दुर्बलानि भवन्ति ।

४ ईश्वरस्य कार ( मनस् ) अपि चिन्तयितुम् अशक्यम् ।

५ सीता ( रक्षस् ) भयेन व्याकुला अभवत् ।

६ ( दुर्वासस् ) शकुन्तलाम् अशपत् ।

७ ( वेधस् ) वाल्मीकये वरम् अयच्छत् ।

८ ( सरस् ) सूर्योदये कमलानि विकसन्ति ।

९ ( चक्षुस् ) ( तेजस् ) जनान् आनन्दयत् वीर ।

१० ( जातवेदस् ) ( अर्चिस् ) ( हविस् ) नयन्ति ।

२ पुढील वाक्यें रीकामी दिलेल्या शब्दांतून योग्य शब्दांनीं पुरीं करा —

१ सहस्राणि रामेण निषूदितानि ।
२ ——— भ्रातर रावण विभीषण उपादिशत् ।
३ साधड्राडे अम्र तेन पर्वत ।
४ दुष्यन्त हुड्डारेण एव विप्रान् अपीडत् ।
५ पुरा वेदविद अवसन् जनस्थाने ।
६ एतस्मिन् जगति सहति एव जनाना ——— ।
७ श्रीकृष्णेन कर्मण बुद्धि ——— मता ।
८ कपय ——— दृष्टार न तु कर्तार ।
९ ——— कमलानि जायन्ते ।
१० सैनिकाना पादाघातै ——— हातम्सा उद्गच्छन्ति ।
(छन्दसाम्, रजस, येक्षसा ज्यायसा रक्षसाम्, धनुष, ज्यायसम्, भूयास अर्चिषाम्, सरसि)

३ सधि करा —शिष्यान् तापस अध्यापयति । वृक्षा पान्थान् छायया तोषयन्ति । भक्त पूजनात् लभते पुण्यम् । हस्तात् शस्त्र पतितम् । अपश्यत् जनक चाप । अज्ञानात् दारा कुर्वन्ति जना । गृहात् हरि निर्गत ।

४ सधि सोडवा —रणाङ्गणाच्छत्र पलायित । परस्परमवदन्नना । सभ्या पणाद्धेतुमायत । अपि यथाल्पेव व्याधो मृगम् ।

---

# पाठ २४—वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणें.

१ (१) मार्गेण गच्छन्ति (जाणाऱ्या) मित्राणि दृष्ट्वा अहं तानि कुशलम् अपृच्छम् ।

(२) गृह प्रविशन्त (शिरणाऱ्या) चोर गृहीत्वा राजपुरुष त कारागृहे न्यक्षिपत् ।

(३) वीरेभ्यः पुत्रेभ्यः स्पृहयन्त्यः (इच्छिणाऱ्या) ललनाः पुरा अवसन् भारतवर्षे ।

(४) युद्धे विजयम् अलभमानं (न मिळवणाऱ्या) सेनापतिं नृपः निरभर्त्संयत ।

(५) आकाशे प्रकाशमानानां (प्रकाशणाऱ्या) तारकाणां सौन्दर्यम् आह्लादयति द्रष्टॄन् ।

(६) श्वश्रूं श्वशुरं च वन्दमानया (नमस्कार करणाऱ्या) स्नुषया आशीर्वादाः लब्धाः ।

(७) शत्रुणा दह्यमानात् नगरात् (जाळल्या जाणाऱ्या) पौराः पलायिताः आत्मानं रक्षितुम् ।

(८) मुनिभिः श्रूयमाणः (ऐकला जाणारा) शुकस्य वृत्तान्तः जाबालिना कथितः ।

वरील सर्व वाक्यांत वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणाचा उपयोग केलेला आहे, हें वाक्यांच्या अर्थावरून ध्यानांत येईल

१, २, ३ मध्यें परस्मैपदी धातूंचीं रूपें, ४, ५, ६ मध्यें आत्मनेपदी धातूंचीं रूपें आणि ७ व ८ मध्यें कर्मणि वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणें उपयोगांत आणलेलीं आहेत, व त्यांचीं रूपें लिंग, विभक्ति, व वचन यामध्यें ज्या नामाशीं त्यांचा संबंध आहे त्याच्या लिंग, विभक्ति व वचन याप्रमाणें आलीं आहेत असें —

गच्छन्ति हें न. द्वि. ब. व. कारण मित्राणि हें न. द्वि. ब. व. आहे

स्पृहयन्त्यः हें स्त्री. प्र. ब. व. कारण ललनाः हें स्त्री. प्र. ब. व. आहे

वन्दमानया हें स्त्री. तृ. ए. व., कारण स्नुषया हें स्त्री. तृ. ए. व. आहे

वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणें कशीं तयार करतात व तीं कशीं चालवतात हें आतां पाहू —

**परस्मैपदी** — गम् — गच्छत् (गच्छन्ति – अन्ति + अत्)
नश् — नश्यत् (नश्यन्ति – अन्ति + अत्)
इष् — इच्छत् (इच्छन्ति – अन्ति + अत्)
प्री — प्रीणयत् (प्रीणयन्ति – अन्ति + अत्)
अस् — सत् (सन्ति – अन्ति + अत्)

श्रु — शृण्वत् ( शृण्वन्ति – अन्ति + अत् )
कृ — कुर्वत् ( कुर्वन्ति – अन्ति + अत् )
ग्रह् — गृह्णत् ( गृह्णन्ति – अन्ति + अत् )
ज्ञा — जानन् ( जानन्ति – अन्ति + अत् )

वरील पृथक्करणावरून असें दिसून येईल कीं धातूचें वर्तमानकाळी तृ. पु. ब. वचना रूप घेऊन त्यातून 'अन्ति' हा प्रत्यय काढावा आणि 'अत्' हा प्रत्यय जोडावा, म्हणजे परस्मैपदा वर्तं का या विशेषणें तयार होतात

२ गच्छत् ( पु )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| गच्छन् | गच्छन्ती | गच्छन्त | प्र. | गच्छत | गच्छद्भ्याम् | गच्छद्भ्य | पं |
| गच्छन्तम् | ,, | गच्छत | द्वि | ,, | गच्छतो | गच्छताम् | ष |
| गच्छता | गच्छद्भ्याम् | गच्छद्भि | तृ | गच्छति | ,, | गच्छत्सु | स |
| गच्छते | ,, | गच्छद्भ्य | च. | गच्छन् | गच्छन्ती | गच्छन्त | स |

वरील रूपें 'सत्' प्रत्ययान्त विशेषणाच्या रूपाप्रमाणें झाली आहेत मात्र प्रथमा एकवचनात उपान्त्य स्वर 'अ' च राहातो

प्रथम गण, चतुर्थ गण, षष्ठ गण, व दशम गण याच्या धातूंची परस्मैपदी वर्तमानकालवाचक धा विशेषणें, आणि सत्, शृण्वत्, कुर्वत्, जानत्, गृह्णत्, यांची रूपें पुल्लिंगामध्यें गच्छत्च्या रूपाप्रमाणें करावी.

३ गच्छत्—नपुंसकलिंगी

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र ग | गच्छत् | गच्छन्ती | गच्छन्ति | प्र द्वि स | इतर पुल्लिंगाप्रमाणें |
| च ग | नश्यत् | नश्यन्ती | नश्यन्ति | प्र द्वि स | ,, |
| द ग | प्राणयत् | प्राणयन्ती | प्राणयन्ति | ,, | ,, |
| | | परंतु | | | |
| षष्ठ ग | इच्छत् | इच्छन्ती-न्ता | इच्छन्ति | ,, | ,, |
| द्वि ग | सत् | सता | सन्ति | ,, | ,, |
| प ग | शृण्वत् | शृण्वता | शृण्वन्ति | ,, | ,, |
| न ग | जानत् | जानता | जानन्ति | ,, | ,, |
| न ग | गृह्णत् | गृह्णती | गृह्णन्ति | ,, | ,, |
| अ ग | कुर्वत् | कुर्वती | कुर्वन्ति | ,, | ,, |

वरील रूपावरून असें दिसून येईल कीं प्र च व द गणाच्या धातूंच्या वर्त० पा० विशेषणाचीं रूपें नपुंसकलिंगामध्यें 'जगत्' प्रमाणें होतात मात्र प्र द्वि स द्विवचनांत 'त्' पूर्वी अनुनासिक येतें. षष्ठ गणाच्या वर्त० धा० विशेषणाच्या नपुं प्र द्वि स द्विवचनांत 'त्' पूर्वी अनुनासिक विकल्पानें येतें व इतर पाच धातूंचीं 'जगत्' प्रमाणें होतात म्हणजे अनुनासिक मुळींच येत नाहीं.

## स्त्रीलिंगी रूपें

### स्त्रीलिंगामध्यें वर्तमान का० धातु० विशेषणें

नपुं. प्रथमा द्विवचनी रूप मूळ शब्द समजून 'नदी' प्रमाणें चालवावा.

### ५ आत्मनेपदी—वर्त० धा० विशेषणें

प्र ग मुद् — मोदमान (मोदन्ते − अन्ते + मान)

च ग बुध् — बुध्यमान (बुध्यन्ते − अन्ते + मान)

ष ग. मृ — म्रियमाण (म्रियन्ते − अन्ते + मान)

द ग मृग् — मृगयमाण (मृगयन्ते − अन्ते + मान)

टीप—जरूर तेथें मान यातील न् चा ण् करावा

वरील रूपें आत्मनेपदी १-४-६-१० या गणाच्या धातूंचीं वर्त० धा० वि० आहेत. तीं मूळ धातूचीं वर्त० तृ० पु० ब० वचनी रूपें घेऊन त्यातून अन्ते हा प्रत्यय काढून व मान हा जोडून तयार करण्यात आलीं आहेत. याचीं पुल्लिंगी रूपें 'देव' प्रमाणें, नपुंसकलिंगी 'वन' प्रमाणें आणि स्त्रीलिंगी 'आ' जोडून 'माला' प्रमाणें केलीं जातात.

### ६ कर्मणि वर्त० धा० विशेषणें

| | |
|---|---|
| गम् — गम्यते – गम्यमान | दा — दीयते – दीयमान |
| जि — जीयते – जीयमान | ह्वे — हूयते – हूयमान |
| हृ — ह्रियते – ह्रियमाण | चुर् — चोर्यते – चोर्यमाण |
| यज् — इज्यते – इज्यमान | तड् — ताड्यते – ताड्यमान |

वरील रूपें तयार करताना धातूचें कर्मणि वर्त० काळ तृ० पुरुषी एकवचनी रूप घेऊन त्यातून 'ते' हा प्रत्यय काढून त्या ऐवजीं 'मान' हा प्रत्यय

जोडलेला आहे ही विशेषणें पुल्लिंगामध्यें 'देव' प्रमाणें, नपुसकलिंगामध्यें 'वन' प्रमाणें आणि स्त्रीलिंगामध्यें 'आ' जोडून 'माला' प्रमाणें चालवावीं

टीप —चतुर्थ गणाच्या आत्मनेपदी धातूंचीं कर्तरि व कर्मणि वर्त० धातु० विशेषणें सारखींच असतात— युध्-युध्यमान ( कर्तरि व कर्मणि )
मन्-मन्यमान ( ,, ,, )

या धड्याच्या आरंभीं दिलेल्या वाक्यावरून हें लक्षात येईल कीं, वर्तमान कालवाचक धातुसाधिताचा उपयोग करावयाचा झाल्यास मुख्य क्रिया व गौण क्रिया एकाच वेळीं चालू असल्या पाहिजेत

जसें—पहिल्या वाक्यात मित्राची चालण्याची क्रिया व विचारण्याची क्रिया एकाच वेळीं चालू आहेत

७ ( १ ) आगते मित्रे बाल अध्ययनम् आरभत—मित्र आल्यावर ....
( २ ) अर्जुनेन कृतायां प्रतिज्ञायां जयद्रथ भयेन अकम्पत—अर्जुनानें प्रतिज्ञा केली तेव्हा .
( ३ ) सूर्ये प्रकाशमाने अन्धकार न प्रसरति—सूर्य प्रकाशत असताना .
( ४ ) गृहं त्यजति पितरि पुत्र दु खित अभवत्—वडील घर सोडीत असताना ......

वरील चार वाक्यामध्यें अधोरेखित शब्द गौण वाक्याबद्दल योजलेले आहेत जसें—**यदा मित्रम् आगतम्, यदा अर्जुनेन प्रतिज्ञा कृता, यावत् सूर्य प्रकाशते, यावत् पिता गृहं त्यजति,** या गौण वाक्याबद्दल पहिल्या दोन वाक्यात कर्मणि भू०धा० विशेषणें व शेवटच्या दोन वाक्यात वर्तमान का० वा० विशेषणें सप्तमीत योजून त्यातील प्रथमान्त पदें सप्तम्यन्त योजलेलीं आहेत पहिल्या दोन गौण वाक्यातील क्रिया पूर्ण झालेली आहे म्हणून कर्मणि भूत० धा० वि० आणि शेवटच्या दोन गौण वाक्यातील क्रिया मुख्य वाक्यातील क्रियाबरोबर चालू आहेत, म्हणून वर्तमान का० या० वि० योजलेलीं आहेत. शिवाय गौण क्रिया व मुख्य क्रिया यांचीं कर्तृपदें भिन्न आहेत. या रचनेला **सति सप्तमी** म्हणतात.

पश्यत ईश्वरस्य जना पाप कुर्वन्ति—ईश्वर पाहात असताना सुद्धा.. ...
ज्या वेळेला अनादर ध्वनित करावयाचा असतो त्या वेळीं सत:षष्ठी योजण्याचा प्रघात आहे. विशेष माहिती सं० वाक्यरचना पाठ ३१ मध्यें पहा.

# नवीन शब्द

असिधाराव्रतम्–तरवारीच्या धारेसारखें कठीण व्रत
कारागृहम्–तुरुंग
दुष्कर (वि.)–करण्यास कठीण
धीर (वि.)–शहाणा, धीट
निधनम्–मरण
प्रतिकारः–अडवणूक
राजपुरुषः–राजाचा अधिकारी
स्तोत्रम्–स्तुतिपूर्ण काव्य
स्नुषा–सून

## प्रश्न

१ पुढील वाक्यांत वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणांची रूपें योजा:–

१ समुद्रस्य तीरं प्रति ( आ+गम् ) नौकाम् अपश्यत् बालः ।
२ पुत्रेण ( पठ् ) श्रीरामस्य स्तोत्रं पितरम् आनन्दयत् ।
३ रावणस्य निधनेन ( वि+सद् ) तस्य पितरौ वानराः आश्वासयन् ।
४ दुःखं ( परी+इ ) मित्रे विश्वासः उपपन्नः ।
५ ( युध् ) सैनिकेभ्यः युद्धम् एव रोचते ।
६ पुत्रजन्मनः वार्तां ( कथ् ) सेवकेभ्यः नृपेण पारितोषिकाणि दत्तानि ।
७ ( अस् २ प. प. ) आचरणम् असिधाराव्रतम् इव दुष्करं वर्तते ।
८ कपोतं ( व्यध् ) व्याधस्य पादतलं सर्पः अदशत् ।
९ ( आ+पत् ) आपदां प्रतिकारं धीरः करोति ।
१० ( आ+रभ् ) कार्यं सम्यक् चिन्तयति प्राज्ञः ।

२ पुढील रूपें ओळखून वाक्यांत योजा:—अभिमानैः, अनुगताः, प्रतिष्ठमानः, आसन्नानाम्, आदिशत ।

३ कर्तरि व कर्मणि वर्त० का० वि० धा:—हन्, हर्, प्र+स्था, सम्+गम्, दी, स्तु, वद्, ग्रह्, दा, आ+दे.

---

## १–४–६–१० गणांतील महत्त्वाचे उपसर्गसहित धातु.

अय ( उद्–उदयते )–उगवणें, उदय होणें
( परा–पला–पलायते )–पळून जाणें
अर्थ् ( प्र–प्रार्थयते )–प्रार्थना करणें
अस् ( अप–अपास्यति )–टाकणें
( निर्–निरस्यति )–नाश करणें
इष् ( अनु–अन्विष्यति )–शोधणें
ईक्ष् ( अप–अपेक्षते )–अपेक्षा करणें
( उद् प्रति )–वाट पाहाणें
( उप–उपेक्षते )–उपेक्षा करणें
( परि–परीक्षते )–परीक्षा करणें
ईर् ( उद्–उदीरयति–ते )–उच्चार करणें
ऋध् ( सम्–समृध्यति )–भरभराट होणें
काश् ( प्र–१ आ प. )–प्रकाशणें
कृत् ( नि–निकृन्तति )–फाडणें
कृष् ( अप–अपकर्षति )–दूर ओढून नेणें
( आ )–ओढणें
कॄ ( प्र–प्रकिरति )–पसरणें, पेरणें
( वि )–उधळणें, फेंकणें
क्षिप् ( अधि )–निन्दा करणें
( नि )–स्वाधीन करणें, ( ठेव ) ठेवणें
खन् ( उद्–उत्खनति )–उपटणें
( नि )–पुरणें, पट वगैरे
गम् ( उपसर्गांच्या [illegible] आहे )
गाह् ( अव–व–१ आ प )–स्नान करणें, आत शिरणें
गै ( उद्–वि )–निन्दा करणें
चर् ( अनु )–अनुसरणें
( उद् )–बोलणें, वर जाणें
चुद् ( प्र–प्रचोदयति–ते )–हांकणें, उत्तेजित करणें
छद् ( आ–आच्छादयति ते )–आच्छादित करणें
( प्र–स )–स्पर्शणें
जि ( वि–परा–१ आ. प. )–जिंकणें, पराजय करणें
डी ( उद्–उड्डयते )–उंच उडणें
तप् ( अनु–पश्चात्–१ प. प. )–पश्चात्ताप होणें
तॄ ( अति–अतितरति )–पलीकडे जाणें
( अव )–खालीं उतरणें
( उद् )–ओलांडून जाणें
( वि )–देणें
दा ( प्रति–प्रतियच्छति )–परत फेड करणें
दिश् ( अप ६ उ. प. )–ढोंग करणें
( आ )–आज्ञा करणें
( उप )–उपदेश करणें
( निर् )–उल्लेख करणें
( प्रत्या )–नाकारणें, निराकरण करणें
[illegible] ( अभि–[illegible] )–हल्ला करणें
( उप )–त्रास देणें
धृ ( उद्–उद्धरति )–वर उचलणें

नन्द् ( अभि-१ प. प. )-अभिनन्दन करणें, आनन्दित होणें

नम् ( अव-१ प. प. )-खाली वाकणें

( उद् )-वर करणें

( उप )-नशिबी येणें

नश् ( प्र-प्रणश्यति )-नाश पावणें

नह् ( अपि वि ४ उ. प. )-झाकणें, पट बांधणें

( सम्-४ आ. प. )-तयार होणें

नी ( अनु-अनुनयति )-मनधरणी करणें, मन वळविणें

( अप )-पळवून नेणें, दूर नेणें

( आ )-आणणें

( अभि )-अभिनय करणें

( निर् )-निश्चित करणें

( परि )-विवाह करणें

नुद् ( अप-अपनुदति )-हाकलणें

प्र— प्रणुदति——हाकलणें

पत् ( अभि-१ प. प. )-हल्ला करणें, चाल करणें

( उद् )-उडी मारणें, उडणें

( परा )-परत फिरणें

( परि )-घिरट्या घालणें

( प्रणि )-नमस्कार करणें

पद् ( उद्-उत्पद्यते )-उत्पन्न होणें

( उप )-पुढाला पडणें, जवळ जाणें

( निस्-निष्पद्यते )-परिणाम होणें

( प्र )-शरण जाणें

पीड् ( निस्-निष्पीडयति )-दाबणें, पिळणें

पृ ( व्या-व्याप्रियते )-गुंतलेला असणें, उद्योगात असणें

प्रच्छ् ( आ-आपृच्छते )-निरोप घेणें

( परि-परिपृच्छति )-चौकशी करणें

बुध् ( प्र-४ आ. प )-जागें होणें

भज् ( वि-१ उ. प. )-विभागणें

भर्त्स् ( निर्-निर्भर्त्सयते )-निन्दा करणें

भाष् ( अप-१ आ. प. )-वाईट शब्द बोलणें

( प्रति )-उलट बोलणें

भू ( अनु-अनुभवति )-अनुभव येणें

( अभि )-अपमान करणें, हल्ला करणें

( आविस्-आविर्भवति )-प्रकट होणें

( उद् )-उत्पन्न होणें

( परा )-पराभव करणें

भू ( प्र. ) ( वि-विभावयति )-विचार करणें, निश्चित करणें

( सम् )-मान देणें

भ्रम् ( परि-परिभ्रमति )-घाटोळ्या फिरणें

( उद्-सम् )-गोंधळून जाणें, वेडा होणें

मद् ( प्र-प्रमाद्यति )-चूक करणें

मन् ( अनु-अनुमन्यते )-परवानगी देणें

( अप-अव )-अपमान करणें

मन्त्र् ( आ-आमन्त्रयते )-निरोप घेणें

( नि )-बोलावणें

मस्ज् ( उद्-उन्मज्जति )-वर येणें

( नि )-बुडणें

मील् ( उद्-उन्मीलति )-डोळे उघडणें

( नि )-डोळे मिटणें

मूल् ( उद्-उन्मूलयति-ते )-उपटणें

मृश् (परा–परामृशति)–स्पर्श करणें
(वि)–विचार करणें
यत् (प्र–प्रयतते)–प्रयत्न करणें
यम् (उप–उपयच्छते)–विवाह करणें
(नि–नियच्छते)–ताब्यात ठेवणें
रभ् (आ–प्रा–प्रारभते)–आरंभ करणें
(परि)–आलिंगन देणें
रम् (उप–उपरमति–ते)–थांबणें, मरणें
(वि–विरमति)–थांबणें
राज् (वि–विराजते)–शोभणें, प्रकाशणें
राध् (अप–अपराध्यति)–अपराध करणें, चुकणें
रुच् (वि–विरोचते)–चकाकणें, प्रकाशणें
रुह् (आ–आरोहति)–चढणें
(अव)–उतरणें
(प्र)–वाढणें, उगवणें
लप् (अप–अपलपति)–नाकबूल करणें
(प्र)–बडबडणें
(वि)–शोक करणें
(सम्)–समाषण करणें
लभ् (उप–उपालभते)–दोष देणें
(विप्र)–फसविणें
लम्ब् (अव–अवलम्बते)–लोंबणें, अटकून ठेवणें
(आ)–आश्रय करणें
(वि)–उशीर करणें
लिङ्ग् (आ–आलिङ्गति)–बाल्गणें, लिहिणें
(वि)–आरखडणें
वद् (अप–अपवदते)–निन्दा करणें
(प्रति–प्रतिवदति)–उत्तर देणें
(वि–विवदते)–भांडणें

वस् (प्र–प्रवसति)–प्रवास करणें
(अनु, अधि, आ, उप, नि)–राहणें
वह् (उद्–उद्वहति)–वर उचलणें, विवाह करणें
(वि–विवहति)–विवाह करणें
विश् (उप–उपविशति)–बसणें
वृत् (अनु–अनुवर्तते)–अनुसरणें
(नि)–परत फिरणें, थांबणें
(प्र)–चालू करणें, पडून देणें
शंस् (प्र–प्रशंसति)–स्तुति करणें
शम् (नि–निशाम्यति)–ऐकणें
(नि–निशामयति ते)—ऐकणें
सद् (अव–अवसीदति)–नाश पावणें
(नि–निषीदति)–बसणें
(प्र–प्रसीदति)–प्रसन्न होणें
(वि–विषीदति)–शोक करणें
सृज् (उद्–उत्सृजति)–सोडून देणें, टाकणें
(वि–विसृजति)–पाठवणें
सो (अध्यव–अध्यवस्यति)–निर्णय करणें
(व्यव)–निश्चय करणें, प्रयत्न करणें
स्था (अनु–अनुतिष्ठति)–अमलांत आणणें, पुरा करणें
(उद्–उत्तिष्ठति)–उभें राहणें
(उप–उपतिष्ठते)–पूजा करणें
स्मृ (वि–विस्मरति)–विसरणें
हस् (उप–उपहसति)–थट्टा करणें
(वि)– ,,
ह्वे (आ–आह्वयति)–बोलावणें
(आ–आह्वयते)–आव्हान करणें

## काहीं व्याकरणविषयक संज्ञा

| मराठी | संस्कृत | इंग्रजी |
|---|---|---|
| वर्तमानकाळ | लट् | The Present |
| प्रथमभूतकाळ | लङ् | The Imperfect |
| आज्ञार्थ | लोट् | The Imperative |
| विध्यर्थ | विधिलिङ् | The Potential |
| प्रयोजक | णिजन्त | The Causal |
| हेत्वर्थक तुमन्त अव्यय | तुमुन्त | The Infinitive |
| पूर्वकालवाचक ल्यबन्त अव्यय | ल्यबन्त क्त्वान्त | The Gerund or The Indeclinable Past Participle or The Absolutive |
| कर्मणि भूतकालवाचक धातु० विशेषण | क्तान्त | The Past Passive Participle |
| वर्तमानकाल० धातु० विशेषण | शत्रन्त (प प) शानन्त (आ प) | The Present Participle |
| कर्तरि प्रयोग | कर्तृवाच्य | The Active Voice |
| कर्मणि प्रयोग | कर्मवाच्य | The Passive Voice |
| भाव प्रयोग | भाववाच्य | The Impersonal Construction |
| प्रथम पुरुष | उत्तम पुरुष | The First Person |
| द्वितीय पुरुष | मध्यम पुरुष | The Second Person |
| तृतीय पुरुष | प्रथम पुरुष | The Third Person |
| प्रथमगण | भ्वादिगण | The First Conjugation |
| चतुर्थगण | दिवादिगण | The Fourth Conjugation |
| षष्ठगण | तुदादिगण | The Sixth Conjugation |
| दशमगण | चुरादिगण | The Tenth Conjugation |

# भाग दुसरा—संस्कृत-पाठ

## ( गद्यविभाग )

### १—ईश्वरः ।

ईश्वरः पृथ्वीं सृजति । सः मनुजान् पशून् खगान् सागरान् पर्वतान् वृक्षान् च सृजति । जनाः ईश्वरं हस्ताभ्यां नमन्ति । ते ईश्वरं कल्याणाय ध्यायन्ति । जनाः ईश्वरस्य प्रतिमां पुष्पैः पूजयन्ति । ते ईश्वरं नयनाभ्यां न पश्यन्ति । भक्ताः ईश्वरं चित्तेन पश्यन्ति । ते ईश्वरस्य गुणान् आनन्देन गायन्ति । भक्तानां निष्ठया ईश्वरः तुष्यति । सः भक्तेभ्यः सुखम् आरोग्यं मोक्षं च यच्छति । एवं ते सुखेन कालं नयन्ति । सङ्कटेषु जनाः ईश्वरं शरणं गच्छन्ति । सः जनान् रक्षति । ईश्वरः सकलां पृथ्वीं पश्यति । सूर्यः चन्द्रः च ईश्वरस्य नयने । अतः भयेन जनाः पापं न कुर्वन्ति । सः जनानां रक्षणाय पृथ्वीम् अवतरति । मत्स्यः ईश्वरस्य प्रथमः अवतारः । कल्किः ईश्वरस्य दशमः अवतारः । ईश्वराय नमः ।

टीपा

'न' म्हणजे 'नाही' हे निषेधार्थ अव्यय क्रियापदाबरोबर [illegible]

'च' म्हणजे 'आणि' हे [illegible]

'च' म्हणजे '[illegible]' हे [illegible] अव्यय [illegible] [illegible] [illegible] [illegible]

'नमः' म्हणजे 'नमस्कार असो' हे अव्यय [illegible]

'[illegible]' [illegible]

### अभ्यास

१ किं किं सृजति ईश्वरः । जनाः तं कथं पूजयन्ति । भक्ताः किं कुर्वन्ति । ईश्वरः तेभ्यः किं किं यच्छति । भक्ताः ईश्वरं कथं पश्यन्ति । सङ्कटेषु जनाः किं कुर्वन्ति । ईश्वरस्य के के अवताराः ।

२ वाक्ये पुरी करा — (१) ——— निद्रया ——— तुष्यति । (२) सूर्यः ——— च ——— नेत्रे । (३) जनाः ——— गुणान् ——— । (४) ईश्वरः ——— रक्षणाय ——— अवतरति । (५) जनाः ——— ईश्वरं ——— ।

३ पाठ करा —अमरा निर्जरा देवास्त्रिदशा विबुधाः सुराः ।

---

## २—शरीरम् ।

एतद् मम शरीरम् । जीवः शरीरे वसति । अतः शरीरं जीवस्य गृहम् । अहं शरीरस्य अवयवान् वर्णयामि । एतौ मम हस्तौ । अहं हस्ताभ्यां देवं नमामि । एकः मम दक्षिणः हस्तः अन्यः च वामः । अहं हस्तेन लिखामि शब्दान् पत्रे । एतौ मम चरणौ । अहं पादाभ्यां चरामि धावामि च । एते मम नेत्रे । अहं नेत्राभ्यां पश्यामि । एतौ मम कर्णौ । अहं कर्णाभ्यां शृणोमि गानं भाषणं वा । हे राम एतद् तव मुखम् । त्वं मुखेन वदसि अन्नं भक्षयसि जलं च पिबसि । गोविन्दः अपि मुखेन वदति अन्नं भक्षयति जलं च पिबति । एषा मम नासिका । अहं नासिकया गन्धं जिघ्रामि । एते मम दन्ताः । अहं दन्तैः अन्नं चर्वामि । रामः अपि दन्तैः अन्नं चर्वति । एषा तव जिह्वा । त्वं जिह्वया रसं जानासि । एतद् मम उदरम् । उदरम् अन्नं धारयति । एतद् मम शीर्षम् । शीर्षे केशाः रोहन्ति । शरीरस्य अन्तर्भागे हृदयं वर्तते । हृदयं शरीरस्य प्रमुखः भागः । हृदयात् रुधिरं शरीरे प्रसरति । नरः अवयवैः कार्याणि करोति ।

---

### टीपा

पुं० एषः—हा, एतौ—हे दोन, न० एतद्—हें, एते—हीं दोन, स्त्री० एषा—ही, एते—ह्या दोन.

'वा' म्हणजे 'अथवा' या उभयान्वयी अव्ययाचा उपयोग 'च' प्रमाणें करावा.

'अपि—सुद्धा' हें अव्यय ज्या शब्दाशीं त्याचा संबंध असेल त्याच्यानंतर योजतात. अवयववाचक शब्द एकाच व्यक्तीसंबंधानें बोलतांना द्विवचनांत योजतात.

### अभ्यास

१ जीभस्य किं ग्रहम्। त्वं हस्ताभ्यां किं करोषि। नरः नेत्राभ्यां किं करोति। अहं मुखेन किं करोमि। त्वं कथं शृणोषि। नरः रसं कथं जानाति। कः प्रमुखः भागः शरीरस्य। हृदयात् किं प्रसरति।

२ वाक्यें पुरीं करा —(१) नरः दन्तैः . . . । (२) अहं नासिकया ... । (३) नेत्राः . . . ... । (४) त्वं हस्तेन . ... ... । (५) नरः पादाभ्यां . .... .. ।

---

## ३—हिमालयः।

हिमालयः पर्वतेषु श्रेष्ठः भवति। भारतवर्षस्य उत्तरतः सः तिष्ठति। हिमालयः भारतवर्षं रक्षति। एतस्य नगस्य शिखराणि अतीव उच्चानि। तानि सर्वदा हिमेन आच्छादितानि सन्ति। अतः सः हिमस्य आलयः अथवा हिमालयः। हिमाचलस्य दुरारोहाणि तुङ्गानि कूटानि मेघाः आश्रयन्ति। तापसाः अपि तत्र वसन्ति स्थिरेण चित्तेन च ईश्वरं ध्यायन्ति। हिमालयस्य अतितुङ्गे शृङ्गे मानसं नाम विशालः सरोवरः वर्तते। सः विकसितैः कमलैः शोभते। तस्मिन् हंसाः विहरन्ति। जलम् अपि स्वच्छं मधुरं च

वर्तते । तस्य समीपे तिष्ठति शिवालयः । हिमालयस्य कन्या पार्वती शङ्करस्य भार्या । हिमालयात् गङ्गा यमुना ब्रह्मपुत्रा च उद्भवन्ति । एतस्य पर्वतस्य तटे निबिडानि अरण्यानि सन्ति । तत्र व्याघ्राः सिंहाः च हिंस्राः सत्त्वाः गुहासु वसन्ति । अतः वनेषु सञ्चारः अपि दुष्करः भवति । हेमन्तकाले हिमालये सर्वत्र हिमं वर्तते । अतः सः शुभ्रवस्त्रेण आच्छादितः इव शोभते ।

---

## टीपा

**उत्तरतः**—तस् प्रत्ययान्त दिशावाचक शब्द षष्ठ्यन्त नामाबरोबर योजतात.

**नाम**—नावाचा—हें अव्यय नामदर्शक शब्दानंतर योजतात व त्याचें नाव त्या अर्थाचा शब्द पुढें असतो आणि ते मागील व पुढील दोन्ही शब्द एकाच विभक्तींत असतात.

**इव**—जणु काय, प्रमाणें—हें अव्यय कल्पनादर्शक शब्दानंतर येतें, व ज्याच्याशीं तुलना करावयाची तो पूर्वीचा शब्द व ज्याशी तुलना तो पुढील शब्द समान विभक्तींत असतात.

## अभ्यास

१ कुत्र तिष्ठति हिमालय । कीदृशानि तस्य शिखराणि । के आश्रयन्ति शिखराणि । कुत्र वर्तते मानसम् । का: नद्यः उद्भवन्ति हिमालयात् । के वसन्ति गुहासु ।

२ रिकाम्या जागी शब्द योजा:—

(अ) हिमालयस्य शिखराणि १ — २ ३
(विशेषण योजा).

(आ) हिमालय पर्वतेषु श्रेष्ठ ।
अर्जुनः श्रेष्ठ ।
सिंह श्रेष्ठ ।

(ई) चन्द्र. इव धवला कीर्तिः ।
— इव सत्यप्रिय. नृप ।
इव शूर. वीर ।

(इ) विशेषणानि नामानि
——— अरण्यम्
— — सत्त्व
— — — जलम्
कमलानि
— शिखरम्

(उ) नाम नृपस्य राम नाम
— अयोध्या नाम
राज्यम् अकरोत् । (पेले)

---

# ४–उद्यानम् ।

विशालेषु नगरेषु उद्यानानि वर्तन्ते । उद्यानैः नगराणां शोभा वर्धते । उपवने विविधाः वृक्षाः लताः च रोहन्ति । वृक्षाः पर्णैः पुष्पैः च शोभन्ते । पर्णानां वर्णः हरितः पुष्पाणां च विविधः । पक्वानि फलानि अपि वृक्षाणां भूषणानि । वृक्षाणां शाखाः फलानां भारेण नमन्ति । लताः वृक्षान् आश्रयन्ति । लतानां कुसुमानि श्वेतानि पीतानि रक्तानि नीलानि वा सन्ति । वृक्षाणां छायासु जना विश्रान्तिसुखं लभन्ते । जनाः वृक्षाणां फलानि भक्षयन्ति । एवं वृक्षा छायया फलैः च जनेषु उपकारं कुर्वन्ति । विहगाः वृक्षेषु वसन्ति । ते नीडानि रचयन्ति तत्र । खगाः अपि वृक्षाणां फलानि खादन्ति । वृक्षेषु खगानां मधुरं कूजनं मनोहरं वर्तते । उद्याने भूमिभाग हरितेन तृणेन आच्छादितः अस्ति । मालाकारः वृक्षान् लताः च जलेन सिञ्चति । उपवनेषु तडागाः अपि सन्ति । तडागानां स्थिरे जले मन्देन पवनेन तरङ्गाः उद्भवन्ति । कमलानि अपि तडागेषु रोहन्ति । सूर्योदये प्रफुल्लैः कमलैः तडागः शोभते । हंसाः तत्र क्रीडन्ति मयूराः च नृत्यन्ति । प्रातःकाले सायंकाले च उद्यानस्य स्वरूपम् अतीव रमणीयम् ।

---

### टीपा

भूमिभाग ( भूमेः भाग ), सूर्योदय ( सूर्यस्य उदय ) हा सामासिक शब्दांचा अर्थ पूर्ण असून प्रथम पदाचा द्वितीय पदाशीं षष्ठी विभक्तीनें संबंध दर्शविला जातो या समासाला षष्ठी तत्पुरुष समास म्हणतात

### अभ्यास

१ वाक्यें पुरीं करा —वृक्षा जनेषु ——— ——— च ——— ——— । वृक्षाणां शाखा ——— ——— ——— । खगा वृक्षेषु ——— ——— । भूमिभाग हरितेन ——— ——— ——— ।

२ कर्मपदं योजय.—खगाः —— आश्रयन्ति । मालाकारः —— च सिञ्चति । जनाः वृक्षाणां —— भक्षयन्ति । जनाः वृक्षाणां छायासु —— लभन्ते ।

३ योग्य विशेष्यं योजय.—हरितानि । मधुरम् । मन्दः । प्रफुल्लानि । विशालानि । पक्वम् ।

४ योग्य शब्दं योजय.—खगाः —— वसन्ति । नराः —— वसन्ति । व्याघ्राः —— वसन्ति । मत्स्याः —— वसन्ति ।

## ५—विहगाः ।

गरुडः मयूरः शुकः कोकिलः च इति विविधाः खगाः सन्ति । गरुडः विहङ्गमानां प्रमुखः । गरुडः नारायणस्य वाहनम् । मयूरः अपि सरस्वत्याः वाहनम् । गरुडस्य शासने खगाः तिष्ठन्ति । विहगाः दिवा इतस्ततः डयन्ते आकाशे । ते भक्ष्यं मार्गयन्ति । खगाः कीटकान् धान्यकणान् च भक्षयन्ति । रात्रौ ते कुलायेषु वसन्ति निद्रासुखम् अनुभवन्ति च ।

शुकः मयूरः कोकिलः कपोतः वायसः च जनानां परिचिताः सन्ति । वायसस्य वर्णः श्यामः शुकस्य हरितः मयूरस्य च चित्रितः वर्तते । वायसस्य कर्कशः स्वरः जनेभ्यः न रोचते । कोकिलस्य मधुरः स्वरः जनान् आनन्दयति । मयूरः केकारवं करोति नृत्यति [illegible] आनन्देन वर्षाकाले । शुकः मनुजः इव शब्दान् वदति । अतः जनाः शुकान् पञ्जरेषु स्थापयन्ति । कपोतस्य स्वभावः सौम्यः कातरः च । मयूरः कोकिलः शुकः कपोतः वा जनानां प्रियः भवति । न तथा वायसः । मयूरस्य स्वरूपं मनोहरं वर्तते । तस्य मस्तके

रम्यः तरलः च पिच्छकानां कलापः शोभते। नृत्यकाले तस्य बर्हः व्यजनम् इव विस्तृतः भवति।

---

### टीप

इव—आवडणे-याचा उपयोग ज्याला आवडणे त्याची चतुर्थी व जी वस्तु आवडते त्या अर्थाच्या शब्दाची प्रथमा विभक्ति योजून करतात

### अभ्यास

१ खगानां च प्रमुख। दिवा खगा किं कुर्वन्ति। ये खगा जनानां परिचिता। किमर्थं जना शुक पञ्जरे स्थापयन्ति। मयूरस्य रूप कथ रम्य भवति। कीदृश स्वभाव कपोतस्य।

२ वाक्यें पुरी करा—मयूर वाहनम्। खगा ——— धान्यकणान् भक्षयन्ति। शुक ——— इव ——— करोति। मयूरस्य तरल ——— कलाप शोभते। ——— इव विस्तृत भवति ——— बर्ह।

३ गरुडस्य शासने खगा तिष्ठन्ति। त्याचप्रमाण,
शासने छात्रा ,, ।
सेनापतेः ,, ,, ।
,, प्रजा ,, ।

४ मयूर रोचते जनेभ्य। क्रीडा रोचते ——— । ——— रोचते ईश्वराय। हास्य रोचते ——— ।

---

## ६—विद्यागृहम्।

रामः मार्गे गोविन्दं पश्यति। तस्य हस्ते पुस्तकानि सन्ति। अतः रामः तं पृच्छति। गोविन्द कुत्र गच्छसि त्वम् इति।

गोविन्दः—अहं पाठशालां गच्छामि। किमर्थं तव हस्ते

पुस्तकानि न वर्तन्ते। अपि त्वं पाठशालां न गच्छसि। किं त्वं स्वैरं भ्रमसि।

रामः—अद्य अस्माकम् अनध्यायदिनं वर्तते। यतः ह्यः एव वार्षिकः क्रीडोत्सवः समाप्तः। अपि अहं त्वया सह तव पाठशालाम् आगच्छामि।

गोविन्दः—अथ किम्। समीपे एव ग्रामात् बहिः अस्माकं भव्यं विद्यामन्दिरं वर्तते। तद् स्थानम् अतीव रमणीयम्। अस्माकं चित्तम् आह्लादयति तद्।

रामः—कथम् इव।

गोविन्दः—शालागृहस्य पुरतः मनोहरं सुरचितं च उद्यानं वर्तते। तस्मिन् विविधाः पुष्पवृक्षाः लताः च रोहन्ति। पार्श्वतः तु वर्तते क्रीडाङ्गणम्। तत्र वयं सर्वे छात्राः विविधैः प्रकारैः सायङ्काले क्रीडामः। अस्माकम् अध्यापकाः अपि विविधेषु शास्त्रेषु निपुणाः सन्ति। ते अस्मान् विविधान् विषयान् सम्यक् अध्यापयन्ति।

रामः—शोभनं खलु तव शालागृहम्। सुभाग्यं तव। अस्माकं विद्यागृहे अपि क्रीडाङ्गणं विना अन्यानि उपयुक्तानि ज्ञानसाधनानि सन्ति। आचार्याः अपि पण्डिताः सन्ति। किन्तु क्रीडाङ्गणं नास्ति यतः नागरिकाणां गृहैः व्याप्ते नगरस्य मध्यभागे तिष्ठति अस्माकं शालागृहम्।

गोविन्दः—शीघ्रं गच्छावः पाठशालाम्।

---

टीपा

यतः—कारण या अव्ययाचा उपयोग कार्यवाचक वाक्यानंतर व कारणवाचक वाक्यापूर्वी करितात. हि—कारण हि उपयोग याच अर्थी कारणवाचक वाक्यामध्यें पहिल्या शब्दानंतर योजून करितात

अपि व किम् यांचा प्रश्नार्थक अव्ययाप्रमाणें उपयोग करितात अपि पहिल्यानें येतें व किम् कोठेंहि वाक्यात येतें

**अथ किम्** याचा उपयोग होकारार्थी उत्तर देताना करितात
**बहि** —बाहेर याचा उपयोग पञ्चम्यन्त नामानंतर करतात

### अभ्यास

१ राम किमर्थं पाठशालां न गच्छति । केन कारणेन तद् अनध्यायदिनम् आसीत् । गोविन्दस्य शालागृह केन कारणेन आह्लादकम् । कुत्र वर्तते रामस्य पाठशाला ।

२ अध्यापका शास्त्रेषु निपुणा । मयूर —— —— प्रवीण । बालका —— —— न निपुणा । वीर —— निपुण । —— राज्यतन्त्रे निपुण ।

३ विद्यागृह ग्रामात् बहि वर्तते । अङ्गण बहि वसत । क्रीडाङ्गण बहि वर्तते । मत्स्य बहि न जीवति ।

४ रामेण सह गोविन्द गच्छति । —— सह पुत्र गच्छति । —— सह गायते नृप । —— सह अध्यापका क्रीडन्ति ।

---

## ७—सागरः ।

भारतवर्षीया सागरा पवित्रा मन्यन्ते । सागरे सर्वाणि तीर्थानि सन्ति । सागर पृथिव्या मेखला इति कवय वर्णयन्ति । समुद्र विस्तीर्ण जलसञ्चय भवति । उदधे जल क्षारम् । अत जना तद् न पिबन्ति । सागरस्य पृष्ठभागे अग्निनौका सञ्चरन्ति । जना ताभि देशान्तर गच्छन्ति वाणिज्य च कुर्वन्ति । वर्षाकाले सागरस्य जले प्रबलेन वातेन क्षुब्धा तरङ्गा उच्चलन्ति । तदा घोर गर्जनारव उत्पद्यते । सागरे बहुविधा सत्त्वा निवसन्ति मत्स्या कूर्मा मकरा च । सागरस्य तले बहुमूल्यानि रत्नानि मौक्तिकानि च तिष्ठन्ति । अत जना सागर रत्नाकर वदन्ति । नद्य सागर विशन्ति । अत सागर नदीपति नदीश वा भवति ।

प्रातःकाले सायङ्काले च समुद्रस्य तीरे सञ्चारः आह्लादकः भवति । शुद्धः प्रशान्तः च पवनः इतस्ततः वहति । उद्यमेन श्रान्ताः जनाः समुद्रतीरे मन्दं मन्दं सञ्चरन्ति । वालुकासु ते सुखेन उपविशन्ति विश्राम्यन्ति च । बालाः बालिकाः नराः नार्यः वृद्धाः तरुणाः धनिकाः दरिद्राः च सर्वे समुद्रतीरं गच्छन्ति । बालाः बालिकाः च सिकताभिः विविधैः प्रकारैः क्रीडन्ति । सागरस्य जलं चन्द्रोदये वर्धते ।

---

### टीपा

विलीयन्ते-एकरूप होणें, मिश्र जाणें. (वि+ली-४ ग. आ. प.)
'इति-अर्थे' हें अव्यय प्रथमान्त नामानंतर अथवा वाक्यानंतर योजतात.
वालुकाः-सिकताः—वाळू-हे शब्द बहुवचनात योजतात.

### अभ्यास

१ केन कारणेन सागरः पवित्रः भवति । जनाः तस्य जलं किं न पिबन्ति । नौकाभिः जनाः किं कुर्वन्ति । समुद्रे कदा तरङ्गाः उद्भवन्ति । सायङ्काले के समुद्रतीरं गच्छन्ति । सागरस्य वेला कदा विस्तृता भवति ।

२ वाक्यें पुरी कराः— —— वालुकासु विश्राम्यन्ति । —— तरङ्गाः उद्भवन्ति । —— सागरे सन्ति । —— समुद्रस्य तीरे वहति ।

३ पुढील विशेषणांना योग्य विशेष्यें योजाः—घोरः, पवित्राणि, प्रबल, बहुमूल्यानि, श्रीमन्ताः, प्रशान्त ।

४ विग्रह कराः—अलमयः । गर्जनारव । रत्नाकरः । समुद्रतीरम् ।

---

## ८—नदी ।

गङ्गा परमपुण्या यमुना च इति नद्यः भारतवर्षे वर्तन्ते । नदी पर्वतात् प्रभवति । प्रथमं नद्याः प्रवाहः अल्पः विद्यते । पश्चात्

क्रमशः सः विततः भवति । नद्याः उद्गमस्थानम् उच्चं भवति । तस्मात् निम्नं प्रदेशं प्रति नदी वहति । वर्षाकाले नदीनां पात्राणि जलेन पूर्णानि भवन्ति । निदाघे तु तानि शुष्यन्ति । अथवा तेषु अतीव अल्पं जलं भवति । नद्याः जले नौकाः सञ्चरन्ति । जनाः नौकाभिः नद्याः पारं गच्छन्ति । नद्याः जलं जनाः क्षेत्राणि नयन्ति । तेन जलेन क्षेत्रेषु विपुलं सस्यं रोहति । नद्याः समीपे समृद्धानि नगराणि वर्तन्ते । नद्याः तीरे वृक्षाः रोहन्ति । तेषां छायासु पान्थाः उपविशन्ति मधुरं जलं पिबन्ति सुखेन च विश्राम्यन्ति । भारतवर्षीया नदी पवित्रा इति मन्यन्ते । अतः धार्मिकाः जनाः नद्याः जले स्नानं कुर्वन्ति पापं क्षालयन्ति पुण्यं लभन्ते च । नद्याः तीरे देवालयाः अपि विद्यन्ते । जनाः देवालयं गच्छन्ति देवस्य प्रतिमां च पूजयन्ति पुष्पैः । नदीनां समीपे तीर्थानि वर्तन्ते । यात्रिकाः पवित्राणि तीर्थानि गच्छन्ति प्रतिवर्षम् । अतः पुण्यं नदीनां दर्शनम् । नदीभ्यः नमः ।

## टीपा

'तु-परन्तु' हें उभयान्वयी अव्यय. किन्तु, परम्, परन्तु याप्रमाणे दोन वाक्यांच्या मध्ये येत नाही तर तें दुसऱ्या वाक्याच्या पहिल्या शब्दानंतर येतें.

'प्रतिवर्षम्-दरवर्षी' हा अव्ययीभाव समास आहे, कारण पहिलें पद प्रति हें अव्यय आहे व सर्व समासाचा उपयोग अव्ययाप्रमाणे केलेला आहे. अशा तऱ्हेचे समास 'वर्षं वर्षं-प्रतिवर्षम्' असे सोडवावे.

## अभ्यास

१ कस्मात् उद्भवन्ति नद्यः । नदीनां पात्राणि कदा पूर्णानि भवन्ति । क्षेत्रेषु विपुलं सस्यं कथं रोहति । नद्याः तीरे किं वर्तते । के जनाः तीर्थानि गच्छन्ति । धार्मिकाः नद्याः जले किमर्थं स्नानं कुर्वन्ति ।

२ योग्य शब्द घाला —नदीनां —— क्षेत्राण्या वर्तन्ते । निम्नं प्रदेशं —— जलं वहति । नद्याः प्रवाहः —— विततः भवति । नद्याः जलं निदाघे —— अल्पं भवति । नद्याः जलेषु —— नौकाः सञ्चरन्ति ।

गोविन्द —कष्टमयं तर्हि कृषीवलस्य जीवितम्। किमर्थम् एष एवं परिश्रमं करोति। नगरे एतादृशः परिश्रमः आवश्यकः न भवति।

राम —एष परिश्रमेण एव आवश्यकं धनं सुखम् आरोग्यं च लभते। अस्य शरीरे रोगाः न पीडयन्ति। अतः सः सन्तोषेण सुखेन च जीवति। क्षेत्रेषु शुद्धः पवनः वहति। निर्मलं जलं सः पिबति सात्त्विकं च अन्नं भक्षयति। नगरे तु सर्वं विपरीतम्। कृत्रिमैः साधनैः जनाः जीवन्ति। अतः ते विशुद्धं सुखं न लभन्ते।

गोविन्दः—कृषीवलस्य जीवितस्य महत्त्वं ज्ञातं मया। अस्तंगतः दिवाकरः। गृहं निवर्तावहे।

## टीपा

'खलु-किल' ही अव्यये 'खरोखर' या अर्थी वाक्याला जोर आणण्याकरिता पहिल्या शब्दानंतर योजतात

प्राक्–पूर्वी हे अव्यय पञ्चम्यन्त नामाबरोबर वापरतात

## अभ्यास

१ रामः गोविन्देन सह कुत्र गच्छति। कृषीवलस्य कः उद्योगः। कृषीवलः कथं विपुलं धान्यं लभते। सः धेनुं सारमेयं च किमर्थं पालयति। परिश्रमस्य कः उपयोगः। जनाः नगरे विशुद्धं सुखं केन कारणेन न लभन्ते।

२ वाक्यें पुरी करा —सारमेयः ___ ।
बलीवर्दौ ___ । रोगाः ___ ।
शुद्धः ___ । कृषीवलः ___ ।

३ योग्य शब्द योजा —छात्राः भारं नयन्ति ___ । कृषीवलः भारं नयति ___ । भक्तः कालं नयति ___ । मूर्खः भारं नयति ___ ।

४ योग्य शब्द योजा — ___ प्राक् पुरुषः स्नानं करोति। ___ प्राक् भक्तः ईश्वरं पूजयति। ___ प्राक् छात्रः गुरुं नमति। ___ प्राक् छात्रः अध्ययनं करोति।

## १०—पशवः ।

सिंहाः व्याघ्राः गजाः भल्लूकाः जम्बूकाः हरिणाः अश्वाः धेनवः सारमेयाः च इति विविधाः पशवः पृथिव्यां वसन्ति । एतेषां सिंहाः व्याघ्राः भल्लूकाः जम्बूकाः च वन्याः पशवः क्रूराः । गजाः हरिणाः च अपि वन्याः पशवः किन्तु ते सौम्याः । अश्वाः धेनवः सारमेयाः च जनानाम् उपयुक्ताः भवन्ति । पशूनां चत्वारः पादाः सन्ति । तथा च लाङ्गूलम् अपि वर्तते । हिंस्राः पशवः मांसं भक्षयन्ति । सौम्याः तु तृणं धान्यं च भक्षयन्ति । सौम्याः पशवः नरान् उपकुर्वन्ति विविधैः प्रकारैः । अश्वाः रथान् कर्षन्ति बलीवर्दाः शकटान् हलानि च कर्षन्ति । सारमेयाः क्षेत्राणि गृहाणि च रक्षन्ति । धेनवः दुग्धं यच्छन्ति ।

हिंस्रैः पशुभिः वनं भीषणं भवति । सर्वेषां वन्यपशूनाम् अथवा मृगाणाम् अधिपतिः सिंहः । अतः सिंहस्य मृगाधिपः मृगपतिः मृगेन्द्रः मृगराजः इति अन्यानि अभिधानानि सन्ति । व्याधाः वन्यान् पशून् शरैः विध्यन्ति । सारमेयाः तेषां साहाय्यं कुर्वन्ति । एवं ते वन्यान् पशून् गृह्णन्ति पञ्जरेषु च स्थापयन्ति । पञ्जरेषु स्थापिताः सिंहाः व्याघ्राः भल्लूकाः च पशुसङ्ग्रहालयेषु वर्तन्ते ।

---

### अभ्यास

१ के पशवः वन्याः । के जनानाम् उपयुक्ताः भवन्ति । केन कारणेन वनं भीषणं भवति । अश्वाः धेनवः सारमेयाः च जनान् कथम् उपकुर्वन्ति । कः मृगाणाम् अधिपतिः । व्याधाः पशून् कथं गृह्णन्ति ।

२ वाक्यपूर्तिं कुरुत:—(१) व्याधानां कुर्वन्ति —। (२) — वन्यान् — पञ्जरेषु —। (३) — पशवः मांसं —। (४) अश्वाः — उपयुक्ताः भवन्ति । (५) हिंस्रैः — वनं — भवति ।

३ कर्मपदांना योग्य अशीं कर्तृपदें व क्रियापदें योजा —

रथान् —— । —— दुग्धम् —— । —— वन्यान् पशून्
—— । —— मांस —— । —— गृहाणि —— ।

## ११–न्यायप्रियः अनङ्गपालः।

हस्तिनापुरे नाम नगरे अनङ्गपालः नाम न्यायप्रियः नृपः अवसत्। तस्य प्रासादस्य द्वारप्रदेशम् उभयतः शिलासिंही स्थापितौ। तयोः पृष्ठयोः उपरि बद्धात् दण्डात् अवालम्बत एका घण्टा। यः एव घण्टाम् अनादयत् सः एव नृपात् न्यायम् अलभत। एकदा कश्चित् वायसः तस्याः उपरि अकस्मात् उपाविशत्। अतः नादः उद्भवत्। अनङ्गपालः तम् अशृणोत् अपृच्छत् च द्वारपालं कः खलु नादयति घण्टाम् इति। वायसः एव इति प्रत्यपद्यत द्वा:स्थः। तदा नृपः अभाषत तर्हि सः वायसः न्यायं प्रार्थयते। किं वाञ्छति सः इति। किन्तु न कोऽपि तस्य इच्छाम् अजानात्। अतः सः नृपः स्वयमेव घण्टास्थानम् अगच्छत् अवदत् च। एष वायसः यथाक्रमं भक्ष्यार्थम् एव अत्र आगतः। किन्तु न अलभत किमपि अत्र। अतः सः खाद्यम् एव इच्छति इति। एवं नृपस्य आज्ञया सेवकः सिंहमुखयोः मांसखण्डान् अस्थापयत्, वायसः च तान् अभक्षयत्। अनङ्गपालस्य राज्ये सर्वे न्यायम् अलभन्त। अहो न्यायप्रियता नृपस्य।

---

टीपा

उभयतः —दोन्ही बाजूंना–हें अव्यय द्वितीयान्त नामाबरोबर योजतात.
यथाक्रमम्—क्रमानुसार–अव्ययीभाव समास–विग्रह (क्रमम् अनुसृत्य)
नादयति—'नद्' चें प्रयोजक रूप–वाजवी

### अभ्यास

१ कुत्र अवसत् अनङ्गपाल । तेन कुत्र घण्टा स्थापिता । किं तस्या प्रयोजनम् । क अकस्मात् तस्याम् उपाविशत् । का वायसस्य प्रार्थना ।

२ विग्रह करा —द्वारप्रदेश । घण्टास्थानम् । सिंहमुखम् । मांसखण्डा ।

३ वाक्यें पुरी करा — ——— उभयत द्वारपालौ तिष्ठत । उभयत नदी तिष्ठत । उभयत बालकौ उपविशत । चौरम् उभयत ——— चलत ।

४ पुरी करा — ——— उपरि काक उपाविशत् । ——— उपरि नृप उपविशति । ——— उपरि खगा वसन्ति । ——— उपरि सेतु वर्तते ।

५ विग्रह करा —यथाकालम् । यथाबलम् । यथालेखनम् ।

---

## १२–मूढशिष्यस्य ।

आसीत् पुरा सुतर्क नाम अध्यापक । वितर्क नाम एक वटु तस्य शिष्य आसीत् । तस्य आश्रम ग्रामात् बहि अरण्ये अवर्तत । बहूनि दिनानि स रात्रौ निद्रा न अलभत मूषकाणाम् उपद्रवेण । अत स आहूयत् स्वशिष्यं वितर्कम् अवदत् च तम् । अयि तात वितर्क मम किमपि कार्यं कुरु । मूषकसंहाराय आनय कमपि मार्जारम् इति । वितर्क आचार्यम् अपृच्छत् आर्य न जानामि अह बिडालस्य स्वरूपम् । कानि तस्य लक्षणानि इति । तदा स अस्मा एक लक्षणानि अकथयत् ।

काचवल्लोचने तस्य वर्णं कपिलधूसर ।
पृष्ठे च लोमशं चर्म रथ्यास्वटति वेद त ॥

वितर्क तदनुसारेण मार्जारान्वेषणाय इतस्तत अभ्रमत् ।

किन्तु न कोऽपि तेन तादृशैः लक्षणैः युक्तः दृष्टः। अन्ते सः मार्गे कमपि मुनिकुमारम् अपश्यत्। तस्य लोचने कान्तवत् आस्ताम्। वर्णः धूसरपिङ्गलः आसीत्। पृष्ठे च तेन लोमशं हरिणाजिनम् धृतम्। मार्गेण च सः पर्यटत्। अतः एषः एव मार्जारः इति स वितर्कः अमन्यत तं च गुरोः पुरतः आनयत् अवदत् च अयं हि आवश्यकलक्षणैः युक्तः मार्जारः आनीतः मया इति। एतेन तस्य मौर्ख्येण विस्मितः स. अध्यापकः उच्चैः व्यहसत् अवदत् च। अहो अज्ञानं वितर्कस्य। अयं तु ब्राह्मणकुमार. न मार्जार.। अत. एव मोचनम् अर्हति इति। एवं लज्जित. सः मूर्खः तम् अमुञ्चत्। अध्यापकः तु स्वयमेव कुतश्चित् मार्जारम् आनयत् मूषकोपद्रवात् च मुक्त. अभवत्।

---

## टीपा

'बहूनि दिनानि—पुष्कळ दिवसपर्यंत' अशा अर्थाचे काळवाचक शब्द द्वितीयेंत योजतात

लहान मुलाशीं बोलतांना 'वत्स-बाळ' असा शब्द योजतात व मोठ्या माणसाशीं अदबीनें किंवा आदरानें बोलतांना 'आर्य' असा शब्द योजतात

## अभ्यास

१ केन कारणेन वितर्कः निद्रां न अलभत। किम् अकथयत् सः स्वशिष्याय। कानि मार्जारस्य लक्षणानि। मुनिकुमारस्य मार्जारेण सह कथं साम्यम् आसीत्। तं दृष्ट्वा अध्यापकः किम् अवदत्। कथं स मूषकाणाम् उपद्रवात् मुक्तः।

२ एषा कथा कुमारैः नाटयितव्या।

३ स निद्रां न अलभत–तेन निद्रा न लब्धा। याप्रमाणें पुढील वाक्यांत धातुसाधित भूतकाळी विशेषणें योजा —

वितर्कः मुनिकुमारम् अपश्यत् (दृष्ट)। वितर्कः मार्जारम् आनयत् (आनीत)। वितर्कः मुनिकुमारम् अमुञ्चत् (मुक्त)।

---

# १३–मूर्खः दासः ।

निवसति स्म पुरा उज्जयिन्यां नाम नगर्यां कश्चित् धनिकः हेमचन्द्रः नाम । तस्य गृहम् आगच्छत् एकदा कोऽपि अतिथिः । अतः सः स्वदासम् आह्वयत् अवदत् च । रे सेवक अद्य गृहे घृतं न अस्ति । अपि त्वं तद् विपणेः आनयसि इति । गृहाण अहं किमपि पात्रं तस्मिन् च घृतम् आनयामि आपणिकात् इति अवदत् सेवकः । अतः सः पात्रम् अगृह्णात् विपणिं च अगच्छत् । तत्र आसन् बहवः आपणिकाः । तेषां एकं प्रति सः अगच्छत् अवदत् च । घृतं मम आवश्यकम् । अहं घृतस्य मूल्यं यच्छामि एतस्मिन् पात्रे च तद् नयामि इति । तदा आपणिकः तस्मिन् पात्रे घृतम् अस्थापयत् मूल्यं च अगृह्णात् ।

सः दासः घृतपात्रेण सह गृहं प्रातिष्ठत । मार्गे तम् अपश्यत् एकः परिहासशीलः बालः । सः तम् अवदत् एतद् तव पात्रम् अधः स्रवति इति । यदा सः मूर्खः तस्य बालस्य शब्दान् अशृणोत् तदा सः तद् पर्यवर्तयत् तद् स्रवति न वा इति अपश्यत् । अतः तद् सर्वं घृतं भूमौ अपतत् सः बालः च तं मूर्खं व्यहसत् । अनन्तरं सः तद् सर्वं धनिकाय अकथयत् । तदा धनिकः तस्मै भृत्याय अक्रुध्यत् तं च गृहात् निरसारयत् ।

टीपा

'निवसति स्म–न्यवसत्' स्म या शब्दाच्या योगाने भूतकाळी अर्थ होतो

'कथ्–सांगणे' याचा उपयोग ज्याला सांगावयाचे त्याची चतुर्थी योजून अथवा कित्येक ठिकाणी द्वितीया विभक्ती देऊन

'क्रुध्, कुप्–रागावणे' याचा उपयोग ज्याच्यावर रागावयाचे त्याची चतुर्थी योजून करावा

'घृतपात्रम्–घृतेन पूर्णं पात्रम्' हा मध्यमपदलोपी समास आहे.

### अभ्यास

१ हेमचन्द्रः स्वदासं किमर्थम् आह्वयत् । किम् अवदत् च दासः तम् । पात्रेण सह दासः कुत्र गतः । किं सः तस्मिन् अस्थापयत् । परिहासशील कुमारः किम् अवदन् । पात्रस्य परिवर्तनात् किम् अभवत् । किमर्थं धनिकः तस्मै अकुप्यत् ।

२ ' दासः पात्रे घृतं स्थापयति ' या वाक्याचें मूळ वाक्य ' घृतं पात्रे तिष्ठति ' त्याचप्रमाणे (१) दासः पात्रं परिवर्तयति । (२) धनिकः दासं निःसारयति । (३) काकः घण्टां नादयति । याचीं मूळ वाक्यें लिहा

३ योग्य शब्द योजा —धनिकः ——— अकुप्यत् । गुरुः ——— कुप्यति । जनकः ——— कुप्यति । नृपः ——— कुप्यति ।

४ खालील शब्दसमूहाबद्दल एकएक समास योजा —शिलया निर्मितः सिंहः । पुष्पैः युक्ताः वृक्षाः । फलेन युक्तः कुम्भः ।

---

## १४—यतेः चातुर्यम् ।

एकदा कश्चित् गोपालः बलीवर्दस्य पृष्ठे व्रीहिभारम् अस्थापयत् मार्गेण च अचलत् ग्रामान्तरं प्रति । मार्गमध्ये गोपालः चिरात् आगतं मित्रम् अपश्यत् तेन सह सम्भाषत च । यावत् सः सम्भाषणे मग्नः तावत् सः बलीवर्दः इतस्ततः अभ्रमत् अदृश्यः च अभवत् । सम्भाषणात् अनन्तरं यदा सः बलीवर्दं तत्र न अपश्यत् तदा सः खिन्नः अभवत् । पश्चात् सः तं चिरम् अन्वैष्यत् । किन्तु तस्य परिश्रमः निरर्थकः जातः । अतः यावत् सः गृहम् उद्दिश्य प्रस्थितः तावत् कोऽपि यतिः तम् अपृच्छत् । भोः गोपाल किमर्थं त्वं दुःखितः । अपि तव बलीवर्दः नष्टः इति । अथ किम् इति गोपालः प्रत्यवदत् । पुनरपि सः तम् अपृच्छत् । अपि तव बलीवर्दः

दक्षिणेन नेत्रेण अन्धः इति । अथ किम् इति पुनरपि सः अवदत् । एवं क्रमशः सः यतिः तम् अपृच्छत् । अपि तव वृषभः पादेन खञ्जः । अपि तस्य पृष्ठे व्रीहिभारः आसीत् इति ।

एतैः प्रश्नैः गोपालः अचिन्तयत् । एषः यतिः मम बलीवर्दस्य लक्षणानि यथार्थतः जानाति । एषः एव मम वृषभम् अचोरयत् असंशयम् इति । अतः सः यतिम् आवेशेन अवदत् । त्वया एव मम बलीवर्दः चोरितः इति अहं मन्ये । अहं त्वां न्यायाध्यक्षस्य पुरतः नयामि इति । एवं तौ न्यायसभां गतौ । न्यायाधीशस्य पुरतः यतिः अवदत् । महाराज मया बलीवर्दः न दृष्टः अपि । कथं तर्हि सः मया चोरितः इति शक्यम् इति । तदा न्यायाधीशः तम् अवदत् । कथं तर्हि त्वया तस्य लक्षणानि कथितानि इति । स यतिः प्रत्यवदत् । मया मार्गे बलीवर्दस्य खुरचिह्नानि दृष्टानि । तेषाम् एकं खुरचिह्नं न स्पष्टम् । अतः बलीवर्दः एकेन पादेन खञ्जः इति मया तर्कः कृतः । तथा च मार्गेण वामपार्श्वस्थं तृणं भक्षितं दृष्टम् न दक्षिणपार्श्वस्थम् । अतः सः दक्षिणेन नयनेन अन्धः इति मया ज्ञातम् । खुरचिह्नानां समीपे च व्रीहिकणाः एव भूमौ पतिताः आसन् । अतः तस्य पृष्ठे व्रीहिभारः आसीत् इति मया चिन्तितम् इति । एतद् यतेः वचनं श्रुत्वा न्यायाधीशः तस्य चातुर्यं प्राशंसत् गोपालं च अनिन्दत् ।

---

टीपा

'त्वया' या क्रियापदाचा व उपसर्ग लावून म्हणजे ते आत्मनेपदी होते.

'नयनेन अन्धः' अवयवाचा उल्लेख करणारे शब्द अवयवबोधक शब्दाच्या तृतीयान्त स्वरूपात योजतात.

अभ्यास

१ एषा कथा वर्गे नाटयितव्या ।

२ गोपालस्य वृषभः कदा चोरितः अभवत् । यतिः मार्गे किम् अपश्यत् । यतिः मार्गे तं किम् अपृच्छत् । प्रश्नान् श्रुत्वा गोपालः किम् अमन्यत । तस्य पुनः यतिम् अवदत् । यतिना लक्षणानि कथं ज्ञातानि । न्यायाधीशः च किम् अकरोत् ।

३ योग्य अव्यये योजा —गोपाल बलीवर्दं ——— अन्वैष्यत् । यति बलीवर्दस्य लक्षणानि ——— अजानात् । यति· बलीवर्दस्य लक्षणानि —— —— अकथयत् ।

४ अन्य देश —देशान्तरम् याप्रमाणें—अन्य धर्म ——— । अन्या पाठशाला ——— । अन्यत् मित्रम् ——— ।

५ प्रयत्नेन अन्ध —काण याप्रमाणें— ——— बधिर । ——— मूक । ——— खञ्ज ।

६ वरील पाठातील सर्व स्वरसन्धि करून लिहा.

---

## १५—वञ्चितः नृपः ।

कस्मिंश्चित् अधिष्ठाने कुम्भकारः प्रतिवसति स्म । तस्य गृहं परितः अर्धभग्नानि कर्पराणि अवर्तन्त । एकदा सः कर्परस्य तीक्ष्णा ग्रस्य उपरि पतितः । अतः कर्परस्य तीक्ष्णया कोट्या तस्य ललाटे क्षतम् अभवत् । तस्मात् अस्रवत् बहु रुधिरम् । कालेन तद् क्षतं विरोपितम् औषधप्रयोगेण । किन्तु तस्य ललाटे प्रहारचिह्नम् अव· शिष्टम् । एकदा दुर्भिक्षसमये सः देशान्तरम् अगच्छत् । तत्र सः नृपस्य प्रासादे सेवकत्वेन स्थितः । सः नृपः तेन प्रहारचिह्नेन अचिन्तयत् शूरः खलु दृश्यते अयम् इति । अतः सर्वेषु राजपुत्रेषु सः तस्मिन् सविशेषम् आदरेण व्यवाहरत् । एतद् राजपुत्राणाम् न अभिमतम् ।

अथ एकदा तस्य नृपस्य देशः शत्रुणा आक्रान्तः । अतः सन्नद्धाः अभवन् नृपस्य सैनिकाः वीराः च युद्धाय । सः नृप तं कुम्भकारं सेनापतिपदे नियोक्तुम् ऐच्छत् । अतः सः नृपः तम् अपृच्छत् । कस्मिन् आहवे हे शूर सम्मुखप्रहारः तव ललाटे लग्नः इति । तदा सः अवदत् । देव न अयं शस्त्रप्रहारः । कुलालः अहं

प्रकृत्या । कर्पराग्रस्य उपरि पतितः अहम् एकदा । तेन अयं प्रहार-विकारः इति । अनेन प्रतिवचनेन लज्जितः सः नृपः अवदत् । अहो कथम् अहं वञ्चितः राजपुत्रसदृशेन कुलालेन । अतः अर्धचन्द्र-प्रदानेन अस्य निःसारणम् इष्टम् इति । एवं विचिन्त्य तेन नृपेण सः राज्यात् बहिः निःसारितः ।

---

## टीपा

परितः—अभितः (सभोंवतीं) या अव्ययाचा उपयोग द्वितीयान्त नामाबरोबर करितात.

व्यव+हृ—वृत् (वागणें) याचा उपयोग ज्याच्याशीं वागावयाचें त्याची सप्तमी योजून करितात.

निः+सृ (नेणें)—याचा उपयोग ज्या ठिकाणीं ज्यास बाहेर नेऊन घालवावयाचें त्याची पंचमी विभक्ति योजून करितात.

## अभ्यास

१ वाक्यें पुरीं करा:—कुलालः गृहं परितः ——— । सततम् औषध-प्रयोगेण ——— । नृपः प्रहारचिह्नेन ——— । नृपः कुलालस्य प्रतिवचनेन ——— ।

२ समास सोडवा:—तीक्ष्णा कोटिः । सम्मुखः प्रहारः । तीक्ष्णम् अस्त्रम् । अर्धमार्गं वर्तनम् ।

३ योग्य क्रमानें वाक्यें लिहा:—(१) महाराज न अयं शस्त्रप्रहारः किन्तु प्रमादचिह्नम् एतद् इति कुलालः अवदत् । (२) एकदा कुम्भकारः कर्परस्य उपरि पतितः । (३) नृपस्य पुरतः गतः दुर्भिक्षसमये सः कुलालः । (४) शत्रुणा सह युद्धकाले नृपः तं सेनापतिं कर्तुम् ऐच्छत् । (५) अतः सः नृपेण अर्धचन्द्रप्रदानेन निःसारितः । (६) मस्तकस्य विशेषेण अलङ्कारं प्रहारचिह्नम् अपश्यत् । (७) नृपः तस्मिन् सादरं व्यवाहरत् । (८) नृपतिः प्रहारचिह्नेन तं वीरश्रेष्ठम् अमन्यत । (९) अनेन प्रतिवचनेन वञ्चितः अहं कुलालेन इति नृपः रुष्टः अवदत् । (१०) कुत्र त्वया सम्मुखप्रहारः लब्धः इति नृपेण सः पृष्टः । (११) तेन तस्य ललाटे क्षतम् अभवत् ।

---

# १६–नागार्जुनकथा।

आसीत् पुरा चिरायुर्नाम नृपतिः। नागार्जुनो नाम तस्य दयालुर्दानशीलश्च सचिव आसीत्। स सर्वासामोषधीनां धर्मानवोधदात्मानं नृपतिं च रसायनेन विजरमकरोत्। स भूपोऽष्टशतं वर्षाणि राज्यमकरोत्। एतस्मिन्दीर्घकाले तस्य बहवो भार्याः पुत्राश्च त्रिदिवं गताः। अन्ते स जीवहरं नाम पुत्रं युवराजपदेऽभ्यषिञ्चत्। स एतां वार्तां जनन्यै न्यवेदयत्। तदा सावदत् त्वादृशा बहवो राजपुत्राः पूर्वमभिषिक्ता यौवराज्ये। किन्तु नान्वभवन्राज्यसुखानि ते यतो नृपो नागार्जुनेन दत्तैरौषधैश्चिरायुर्जातः। अतो यदि त्वं राज्यपदं वाञ्छसि तर्हि नागार्जुनं गच्छ तं च तस्य शीर्षमेव याचस्व। स हि याचकानां मनोरथान्सर्वदा पूरयति। एवं यदा नागार्जुनो म्रियते तदा नृपोऽपि सुचिरं न जीवति त्वं च नृपो भवसि इति। स पुत्रो नागार्जुनं गत्वा तथाकरोत्। किन्तु नागार्जुनस्य शीर्षच्छेदने सोऽसमर्थः। अतो नागार्जुनः स्वयमेवात्मनः शीर्षच्छेदमकरोत्। नागार्जुनवधं श्रुत्वा स नृपतिरपि राज्यमत्यजद्वनं च प्राविशत्। राजपुत्रः सिंहासनमारोहत्किन्तु नान्वभवद्राज्यसुखं बहुकालं यतः क्रुद्धैर्नागार्जुनपुत्रैस्तस्य वधः कृतः।

---

## टीपा

चिरायुस्–हा व्यंजनान्त शब्द आहे चिरायु–प्र. ए. व. चिरायुष–षष्ठी ए. व.

'अष्टशत वर्षाणि—८०० वर्षे' वाल्यानंतर द्विगौ शत, सहस्र हे शब्द बहुवचनी नामापूर्वी एकवचनात योजतात

'नि + विद् (प्रयोजक)–निवेदयति—सांगणे, कळविणे' याचा उपयोग ज्याला सांगावयाचें त्याची चतुर्थी योजून करितात

'दीर्घकाल.—दीर्घ काल' विशेषणविशेष्य कर्मधारय समास.

'आत्मानम्—स्वतःला, आत्मनः—स्वतःचें.'

### अभ्यास

१ चिरायुष क सचिव । स कथं नृप विनरम् अकरोत् । जीवहराय जनना किम् अकथयत् । स नागार्जुन किम् अयाचत । नृप किमर्थं वन प्राविशत् । केन कारणेन नागार्जुनपुत्रा जीवहरम् अमारयन् ।

२ वाक्यात उपयोग करा —अभिषिक्त, अनुभूत, त्यक्त, दृष्ट

३ 'दान शील यस्य स दानशील' याप्रमाणे पुढील समासाचा विग्रह करा —उद्यमशील, परिहासशील, उपकारशील ।

४ विग्रह करा —राज्यसुखानि, राज्यपदम्, शीर्षच्छेद, नागार्जुनवध ।

५ क्रियापदाबद्दल भूतकालवाचक धातुसाधित विशेषणे योजा —राजपुत्रा त्रिदिवम् अगच्छन् । नृपति वन आविशत् । राजपुत्र सिंहासनम् आरोहत् ।

---

## १७—कृतज्ञो नकुलः ।

कस्मिन्नपि नगरेऽवसत्कोऽपि ब्राह्मणः । एकदा तस्य भार्यायां सुतो जातः । तस्य गृहे कापि नकुली पालिता । तस्मिन्नेव दिने तस्यामपि नकुलोऽजायत । अतः सा ब्राह्मणी स्वसुतवत् नकुलमप्यपुष्यत् । किन्तु कदाचिदेष स्वदारकं पीडयेदिति विचारेण सा तस्मिन्विश्वासं नाकरोत् । एकदा सुप्तं स्वपुत्रं शय्यायां स्थापयित्वा जलकुम्भं च गृहीत्वा सा तडागतीरमगच्छत् । गमनात् प्राक् स्वपतिं सावदत् । नकुलाद्रक्षणमर्हति बाल इति । तस्या गमनादनन्तरं बालस्य न किमपि भयं नकुलादिति मत्वा स ब्राह्मणोऽपि भिक्षार्थं कुत्रापि गतः । अत्रान्तरे कोऽपि कृष्णसर्पो बिलाद्बहिरागतः । नकुलोऽपि स्वभाववैरेण बालस्य रक्षणार्थं तेन सहायुध्यत । एवं नकुलेन खण्डशः कृतः स सर्पः । यदा सा ब्राह्मणी गृहं प्रवि-

यावत्तदा स नकुलस्तस्याः समीपं गतः। सा तस्य मुखं रुधिरेण लिप्तमपश्यत्। अतः साऽचिन्तयन्नूनमनेन मम सुतस्य वधः कृत इति। एवं क्रुद्धा सा जलकुम्भं तस्योपरि सहसैव प्राक्षिपत्। तेनाघातेन मृतः स नकुलः। पश्चाद्भीता सा यावद्गृहं प्रविशति तावत्सा बालकं सुरक्षितं तथा च सर्पं मृतमपश्यत्। अतः साऽऽत्मनोऽविचारतामनिन्दन्नकुलस्य कृतेऽशोचच्च।

अपरीक्ष्य न कर्तव्यं कर्तव्यं सुपरीक्षितम्।
पश्चाद्भवति सन्तापो ब्राह्मण्या नकुले यथा॥

---

## टीपा

'**नूनम्**—खरोखर' हें अव्यय जोर देण्याकरिता वाक्याच्या आरंभीं योजतात
'**कृते**—करिता' या अव्ययाचा उपयोग षष्ठ्यन्त नामाबरोबर करितात.

## अभ्यास

१ ब्राह्मणी नकुलं कथमपालयत्। केन कारणेन सा तस्मिन्विश्वासं नाकरोत्। जलकुम्भं गृहीत्वा सा किमकरोत्। ब्राह्मणः किं मत्वा बहिर्गतः। बालकस्य समीपं क आगतः। तदा नकुलः किमकरोत्। केन कारणेन सा नकुलस्योपरि जलकुम्भं प्राक्षिपत्। किमर्थं साऽऽत्मानमनिन्दत्।

२ ल्यबन्त अव्ययें योजून वाक्यें लिहा —

सा नकुलस्य मुखं रुधिरेण लिप्तमपश्यदचिन्तयच्च।
साऽऽत्मनोऽविचारतामनिन्दन्नकुलस्य कृतेऽशोचच्च।

३ ल्यबन्ताबद्दल क्रियापदाचीं रूपें योजा —

सा पुत्रं शय्यायां स्थापयित्वा बहिरगच्छत्।
सा जलकुम्भं गृहीत्वा तडागमगच्छत्।

---

